


**KavitaSagar Publishing Agency**

कवितासागर पब्लिशिंग एजन्सी, जयसिंगपूर

- International Standard Book Number: **978-81-949977-8-8**
- Title - **Dnyaneshwaritil Gurugamya Dnyan**
  **ज्ञानेश्वरीतील गुरूगम्य ज्ञान**

ISBN 978-81-949977-8-8

9 788194 997788

- Edition - **First**
- Volume - **One**
- Price - **Rs. 360/-**
- Pages - **112 + 8 = 120** (Including Covers)
- Language - **Marathi**
- Compiler - **Mahesh Mansing Nikam (Kolhapur)**
- Subject - **Spiritual**
- Year of Publication / Date of Issue - **10 July 2025**
- Book Version - **Paperback**





- Published in India by - **Dr. Sunil Dada Patil**
  Publisher Agency - **KavitaSagar**
  Imprint - **KavitaSagar Publishing Agency, Jaysingpur**
  **Post Box Number - 69, Bypass Road, Jaysingpur - 416101,**
  Taluka - Shirol, District - **Kolhapur**, Maharashtra, **India**
  08484986064, 09975873569, sunildadapatil@gmail.com
- Printed in India by - **Dr. Sunil Dada Patil**
  On behalf of the **KavitaSagar Printing Services**

## - मुख्य मार्गदर्शक -

**परमपूज्य श्री समर्थ सद्गुरू मोहिते सरकार महाराज, भैरववाडी (कुरूंदवाड)**

## - संपादक मंडळ -

**०१) श्री. मनोज आप्पासाहेब मक्ते - ९८९०८७२२१२**

**०२) श्री. समीर टाकळे - ७२१८९३९८८२**

**०३) श्री. जयवंत सखाराम मोहिते - ७७७६९५९६९६**

**०४) श्री. प्रवीण माळी - ९९२१८३३२८०**

**०५) श्री. महेश मानसिंग निकम - ९०११०८९७४५**



# मनोगत

## ॥ जय सद्‌गुरू ॥

सार्थ **ज्ञानेश्वरी** मधील काही निवडक गुरूगम्य ओव्या व त्यांचा मराठीतील अर्थ व त्याचा **गुह्यार्थ** आमचे सद्‌गुरु 'परमपूज्य श्री समर्थ सद्‌गुरु मोहिते सरकार महाराज' यांनी या पुस्तकरूपाने सांगितलेला आहे, तो सर्व भाविक भक्तांना सादर करताना आनंद होत आहे व त्याची पहिली आवृत्ती सन 2025 च्या गुरुपौणिमेच्या शुभ दिनी प्रकाशित करीत आहोत.

'गुरुगम्य ज्ञान' या शब्दात त्याचा **गुह्यार्थ** आहे. जसे आपल्या सर्वांच्या मध्ये त्या परम कृपाळू परमात्म्याचा अंश आहे, त्याला जाणून घेण्यासाठी, समजून घेण्यासाठी व त्याची ओळख करून घेण्यासाठी लागणारे जे गुरुगम्य ज्ञान आहे ते केवळ 'तत्वमसिचा अभ्यास' महावाक्याच्या बोधाने सद्‌गुरु कृपेद्वारेच होऊ शकतो.

तेच गुरुगम्य ज्ञान सामान्य लोकांपर्यंत पोहोचावे म्हणून आमचे 'सद्‌गुरु परमपूज्य श्री मोहित सरकार महाराज' व भगवान शंकर यांच्या आशीर्वादाने 'ज्ञानेश्वरीतील गुरुगम्य ज्ञान' या पुस्तक रूपाने मांडण्याचा हा प्रामाणिक प्रयत्न केला आहे.

सद्‌गुरु कृपांकित,
**संपादक मंडळ**
कुरूंदवाड

# प्रस्तावना

सर्व मनुष्यजन व परमात्मरूपी अंशांना नमन, आम्हास ज्ञानेश्वरीतील गुरुगम्य ज्ञानाचे भांडार परमात्म स्वरूप 'सद्‌गुरू दास कबीर नागांवकर महाराज' यांचेकडून मिळाले आहे. ते ज्ञान सर्वांसमोर मांडताना आम्हाला अत्यंत आनंद होत आहे.

संत ज्या मार्गाने गेले तो मार्ग त्यांचे वाङ्‌मय, साहित्य त्यांनी खूप हाल व अपेष्टा सहन करून जनसामान्यांसमोर चव्हाट्यावर मांडले त्यातील गुह्य हे मात्र गुह्यच राहिले.

संत ज्या मार्गाने गेले तो संतांचा नव्हे तर स्वतः परमात्म्याने सांगितलेला त्याचा स्वतःचा सोऽहंचा मार्ग, त्या मार्गाने संतांनी मार्गक्रमण करून आपले जीवन सच्चिदानंद स्वरूप व सार्थक केले, तर असा हा मार्ग म्हणजे 'आकाशमार्ग गुप्तपंथ' होय. पक्षी जसे विहंगम विहार करून योग्य पिकलेली फळे निवडतात, तसेच योग्य असा हा आपला आध्यात्मिक मार्ग निवडून व त्याचे वर्म जाणून आपण मनुष्य जन्माचे सार्थक करावयाचे आहे.

परमात्म्याच्या रुपाने ज्ञानेश्वर माऊलीच्या ब्रम्ह स्थितीतून मांडलेली जी सार्थ ज्ञानेश्वरी आहे, त्यामध्ये एकूण अठरा अध्यायांचा केलेला प्रपंच केवळ तत्वमसिचा अभ्यास व गुरुवाक्याचा बोध सांगण्यासाठी केला आहे. भगवान शंकर यांच्या आज्ञेप्रमाणे या गुरुगम्य ज्ञानाचा उलगडा आम्ही या पुस्तक रुपाने मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

ज्ञान हे सर्वांमध्ये उपजतच आहे, सद्‌गुरु फक्त अज्ञान दूर करतात. 'आकाशमार्ग गुप्तपंथ' हा केवळ एकच असा मार्ग आहे ज्यामध्ये मनुष्य प्राणी सद्‌गुरुकृपेने पूर्णत्वास जाऊ शकतो.

या मार्गाचा लाभ सर्व मनुष्यजनांना मिळावा हीच परमात्म्याकडे प्रार्थना व आम्ही ज्या आनंदात आहे, तो आनंद सर्वांना मिळावा हीच आमची माफक अपेक्षा!

सद्‌गुरु कृपांकित,
श्री समर्थ सद्‌गुरु मोहिते सरकार महाराज, कुरूंदवाड

# ज्ञानेश्वरीतील गुरूगम्य ज्ञान

या पुस्तकामध्ये ज्ञानेश्वरी मधील ओवी त्यांचा अर्थ व गुरूगम्य ज्ञान याची ओळख करून दिली आहे.

## अध्याय अनुक्रमणिका

# अध्याय - पहिला

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पहिला**, ओवी - १
**ॐ नमोजी आद्या । वेद प्रतिपाद्या ।**
**जय जय स्वसंवेद्या । आत्मरुपा ॥१॥**

**मराठी अर्थ** - ॐ हाच परमात्मा आहे, असे कल्पून ज्ञानेश्वर महाराज येथे मंगल करतात. हे सर्वांचे मूळ असणाऱ्या व वेदांच्या प्रतिपादनाचा विषय असणाऱ्या श्री ॐ, तुला नमस्कार असो व स्वत:ला स्वत: जाणण्यास योग्य असणाऱ्या आणि सर्वव्यापी अशा आत्मरूपी ॐ तुझा जयजयकार असो.

**गुह्यार्थ** - ओम - ॐ - ब्रम्ह - आत्मस्थितीमध्ये जाण्याची पहिली पायरी
- ओंकार - ॐ - माया - जिवस्थिती

जो मूळचा परमात्मा आहे व ज्याची वेदांनी प्रशंसा केली आहे आणि त्याने निर्माण केलेल्या आत्मस्थितीने स्वत:ने स्वत: ओळखण्यास योग्य असणाऱ्या सर्वव्यापी अशा निराकार परमात्म्या तुझा जयजयकार असो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पहिला**, ओवी - २०
**हे तिन्ही एकवटले । तेथें शब्दब्रह्म कवळले ।**
**ते मियां श्रीगुरूकृपा नमिले । आदिबीज ।।२०।।**

**मराठी अर्थ** - या तिन्ही मात्रा एकत्र झाल्या म्हणजे संपूर्ण वेद कवटाळला जातो. त्या मूळ बीजरूपी गणपतीला मी गुरूकृपेने नमस्कार करतो.

**गुह्यार्थ -** आकार, उकार, मकार या देहाच्या तिन्ही भागांच्या पलीकडे असलेली ब्रह्मस्थिती म्हणजेच ब्रह्मबीज. मी सद्‌गुरू कृपेने जाणली, जी वेदांनाही जाणता आली नाही, अशा त्या स्थितीला मी नमस्कार करतो.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय **- पहिला**, ओवी - २२
**मज हृदयीं सद्‌गुरू । जेणे तारिलो हा संसारपूरु ।**
**म्हणौनि विशेषें अत्यादरू । विवेकावरी ।।२२।।**

**मराठी अर्थ -** ज्यांनी मला या संसारपुरातून तारले, ते सद्‌गुरू माझ्या हृदयात आहेत, म्हणून माझे विवेकावर फार प्रेम आहे.

**गुह्यार्थ -** माझ्या हृदयकमळ म्हणजेच ब्रह्मरंध्रामध्ये स्थित असलेल्या सद्‌गुरू, ज्यांनी मला या मायेच्या (श्वास) पाशातून तारले अशा सद्‌गुरूंचा मी विवेकाने (अभ्यासाने) विशेष रूपाने आदर करतो.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय **- पहिला**, ओवी - ४९
**जें अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम ।**
**परम मंगलधाम । अवधारिजो ॥४९॥**

**मराठी अर्थ -** ऐका, हे महाभारत अद्वितीय, उत्तम, अतिपवित्र, निरूपम आणि श्रेष्ठ असे मांगल्याचे ठिकाण आहे.

**गुह्यार्थ** - ब्रम्हज्ञानाला जन्म देणारी ही भारतीय कथा जे महाभारत, परमात्म्याने वारंवार देह बदलणाऱ्या जीवाला महावाक्यांचा उपदेश केला ते हे अतिशय उत्तम, अद्वितीय, अतिपवित्र सहजरीत्या मांडता येणारे आणि श्रेष्ठ असे मंगलधाम आहे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पहिला**, ओवी - ५३

**जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं ।**
**सोऽहंभावें पारंगतीं । रमिजे जेथ ॥५३॥**

**मराठी अर्थ** - वैराग्यशील पुरुष ज्याची (गीतारूप तुपाची) इच्छा करतात, संत जे नेहमी अनुभवितात व सोऽहं भावाने पार पावलेले जेथे रममाण होतात.

**गुह्यार्थ** - सो म्हणजे - आत्मा (आत्मस्थिती) ऽहं म्हणजे मी जीव (जीवस्थिती), जीवस्थितीतून आत्मस्थितीत सोऽहं च्या मार्गाने जाणे त्यालाच सोऽहं भाव म्हणतात. ज्या शब्दातीत (अनिर्वाच्छ) श्वासातीत अशा स्थितीला संत व सद्गुरू नेहमी अनुभववितात व त्यामध्ये रममाण होतात. अशा स्थितीत जाण्याची वैराग्यशीलता म्हणजेच मायेच्या पाशातून मुक्त झालेला पुरुष इच्छा व्यक्त करतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पहिला**, ओवी - ५७

**तियापरी श्रोतां । अनुभवावी हे कथा ।**
**अति हळुवारपणे चित्ता । आणूनियां ॥५७॥**

**मराठी अर्थ** - त्याप्रमाणे चित्त अगदी हळुवार करून (वासनांचे जाड्य काढून) मग श्रोत्यांनी ही कथा अनुभवावी.

**गुह्यार्थ** - परमात्म्याने सांगितलेल्या या महावाक्याचा बोध म्हणजेच तत्त्वमसिचा अभ्यास अनुभव व स्थितीचा आनंद ज्या जीवांला घ्यायचा आहे, त्यांनी या मायेच्या पलीकडील श्वास व इंद्रियापलीकडे जाऊन ही स्थिती अनुभवावी (अनुभवच होणे).

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पहिला**, ओवी - ७१
**तेथ हरू म्हणे नेणिजे । देवी जैसें कां स्वरूप तुझें ।**
**तैसें हें नित्यनूतन देखिजे । गीतातत्व ॥७१॥**

**मराठी अर्थ** - त्यावर शंकर म्हणाले, “हे देवी, ज्याप्रमाणे तुझ्या स्वरूपाचा थांग लागत नाही, त्याचप्रमाणे गीतातत्त्वाचा विचार करावयास जावे, तेव्हा (ते) दररोज नवीनच आहे असे दिसते.”

**गुह्यार्थ** - परमात्मा महावाक्याच्या बोधाचे स्पष्टीकरण देताना असे म्हणतात की, महावाक्याचा बोध स्वीकारल्यानंतर जर तुम्ही गीतातत्त्वाचा अभ्यास कराल (वर्म) तर त्यात तुम्हास नेहमीच एक सुंदर अशा रत्नांची खाण व गर्भित अर्थाची अमृतधारा लाभेल.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पहिला**, ओवी - २०३
**हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मेयाहि नयेचि आया ।**
**म्हणौनि भुलविला ऐकें राया । संजयो म्हणे ॥२०३॥**

**मराठी अर्थ** - संजय म्हणाला, “राजा, ऐक. हा स्नेह म्हणजे परमात्म्याची माया आहे. ही ब्रम्हदेवालाही आकळत नाही, म्हणून त्याने अर्जुनाला भुरळ पाडली.”

**गुह्यार्थ** - परमात्म्याची पडछाया म्हणजे ‘माया’ होय आणि या मायेनेच जीवाचा भ्रम केला, की मी देह आहे. म्हणून जीव हा श्वासाच्या योगे जीव दशेमध्ये अडकला आणि त्याची त्याला भुरळ पडली आहे आणि ही माया प्रत्यक्ष ब्रम्हदेवालाही समजली नाही (अनाकलन).

# अध्याय - दुसरा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - दुसरा, ओवी - १०२

**देखें जे विवेकी जे होती। ते दोहींतेही न शोचिती।**
**जे होय जाय हे भ्रांती। म्हणौनियां॥१०२॥**

**मराठी अर्थ** - हे पहा, जन्म व मृत्यू हे केवळ भ्रांती असल्यामुळे जे विचारवंत आहेत ते या दोहोंचाही (दोहोंबद्धलही) शोक करत नाहीत.

**गुह्यार्थ** - महावाक्याचा बोध झालेला आत्मस्थितीतील पुरुष हेच समजतो की, जन्म व मृत्यू ही केवळ भ्रांती आहे आणि म्हणून तो या दोन्ही गोष्टींचा शोक करत नाही.

संत कबीर असे म्हणतात, जन्मच नही तो मरण कहासे।

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - दुसरा, ओवी - १२६

**या उपाधिमाजीं गुप्त। चैतन्य असे सर्वगत।**
**तें तत्वज्ञ संत। स्वीकारिती॥१२६॥**

**मराठी अर्थ** - या देहादी प्रपंचामध्ये सर्वत्र चैतन्य गुप्त रूपाने आहे. तत्त्व जाणणारे संत ते ओळखून त्याचेच ग्रहण करतात.

**गुह्यार्थ** - या देहादी प्रपंचामध्ये असणारे चेतना (आत्मा) आणि चैतन्य (जीव) यांच्यामध्ये जीव, आत्मा, बुद्धी, परमात्मा, ईश्वर, परमेश्वर हे सर्व गुप्त रूपाने आहेत, परंतु ते देहापासून वेगळे

आहेत. हे केवळ तत्त्वमसी या महावाक्याचा बोध जाणणारे त्या परमात्मस्थितीला जाऊ शकतात.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - दुसरा, ओवी - १३४

**हा लोकत्रयाकारु। तो जयाचा विस्तारु।**
**तेथ नाम वर्ण आकारु। चिन्ह नाहीं ॥१३४॥**

**मराठी अर्थ** - हे तिन्ही लोक हा ज्याचा विस्तार आहे त्याला नाम, वर्ण, आकार अशी काही चिन्हे (लक्षणे) नाहीत.

**गुह्यार्थ** - हे तिन्ही लोक (१) स्वर्गलोक, (२) मृत्यूलोक, (३)पाताळलोक हा ज्याचा विस्तार आहे, तो परमात्मा या देहामध्ये आहे. (**पिंडी ते ब्रम्हांडी**) श्वासमंत्रामध्ये आहे. त्याचे नामस्मरण म्हणजेच हे कर्मकांड आहे, असे सामान्य लोक समजतात; पण तो परमात्मा हा निराकारी आहे, त्याला वर्ण, नाम, आकार व रंग नाही. हे केवळ आत्मस्थितीतील म्हणजेच तत्त्वमसी महावाक्याचा बोध झालेला पुरुषच जाणू शकतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - दुसरा, ओवी - १५९

**उपजे तें नाशे। नाशलें पुनरपि दिसे।**
**हें घटिकायंत्र तैसें। परिभ्रमे गा ॥१५९॥**

**मराठी अर्थ** - जे उत्पन्न होते ते नाश पावते व नाश पावलेले पुन्हा दिसते. अर्जुना, रहाटगाडग्यासारखा असा हा क्रम अखंड चालतो.

**गुह्यार्थ** - उत्पत्ती, स्थिती आणि लय हा मायेचा खेळ आहे आणि जे माया विरहित आहे ते म्हणजेच गीतेतील वर्म होय.

(१) वर्म नाही ठावे, त्याने ब्रम्ह कैसे व्हावे.
(२) राहिले ते वर्म वेगळेची.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **दुसरा**, ओवी - १६४

**जें समस्तें इयें भूते । जन्माआदि अमूर्ते ।**
**मग पातलीं व्यक्तीतें । जन्मलेया ॥१६४॥**

अध्याय - **दुसरा**, ओवी - १६५

**तियें क्षयासि जेथ जाती । तेथ निभ्रांत आने नव्हती ।**
**देखें पूर्व स्थितीच येती । आपुलिये ॥१६५॥**

**मराठी अर्थ** - कारण हे सर्व जीव जन्माच्या अगोदर निराकार होते. मग जन्मल्यावर त्यांना आकार प्राप्त झाला. (१६४) ते जेथे नाश होऊन जातात तेथे नि:संशय वेगळे असत नाहीत. पहा, ते आपल्या मूळच्या (अव्यक्त) अवस्थेलाच येतात. (१६५)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक १६४ आणि १६५ मिळून) आत्मस्थिती: मातेच्या गर्भामध्ये (पोकळी - आकाश) मातेचे रज व पित्याचे वीर्य आणि सातव्या महिन्यापर्यंत माता जे अन्न खाते त्यापासून आपला देह तयार झाला, तो नाळेवाटे.

(१) रज आणि वीर्य म्हणजे पाणी.
(२) पोकळी (गर्भ) म्हणजे आकाश.
(३) देह तयार व्हायला अग्नी.
(४) पृथ्वीतत्त्व

ही चार पंचमहाभूते गर्भातली. सातव्या महिन्यानंतर देहात आत्म्याचा प्रवेश होतो. नऊ महिने नऊ दिवसांनी देह ज्यावेळी भूतलावर अवतरतो त्यावेळी प्रथम त्याचा आवाज निर्माण होतो (ट्या) त्याच वेळी ब्रम्हांडातील वायुचा प्रवेश (पाचवे तत्त्व) होतो आणि मूळमायेचा प्रवेश हा गुदामधून होतो. त्यावेळी त्याची गर्भातील आत्मस्थितीचे जीवस्थितीत रूपांतर होते म्हणून जीव या स्थितीतून पुन्हा आत्मस्थितीत जाण्यासाठी तत्त्वमसी या महावाक्याचा बोध असणे आवश्यक आहे.

**पंचरत्नगीता**

देही असता जीवाते सप्तमास होता त्यास आठवीते माते स्मरण ध्याने मग उपजल्यावरे अंगी लागे वायू धरित्री अवघेची विसरे सोऽहं शब्दाते.

सोऽहं शब्द याचा विसरला कोऽहं शब्द याचा विकासला, तो मायेने भुलला विसरला चारी जन्म

तुका म्हणे गर्भवासी सुखे घालावे आम्हासी

मी कोण? याची ओळख तत्त्वमसि महावाक्याच्या बोधानेच होते.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - दुसरा, ओवी - १८०

**तूं अझुनि कां न विचारिसी । काय हें चिंतितु आहासी ।**
**स्वधर्मु तो विसरलासी । तरावें जेणें ॥१८०॥**

**मराठी अर्थ** - तू अजून (याचा)  का विचार करीत नाहीस? काय हे मनात घेऊन बसला आहेत? ज्याच्या योगाने तरुन जावयाचे तो आपला धर्म तू विसरला आहेस.

**गुह्यार्थ** - परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, तू जो स्वधर्म म्हणजे तुझी मूळची निराकार आत्मस्थिती या मायेच्या पाशामुळे विसरला आहे, ती आत्मस्थिती महावाक्याच्या बोधाने जाणून घे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - दुसरा, ओवी - २५५
**म्हणौनि हे पार्था । दुर्बुद्धि देख सर्वथा ।**
**तयां वेदवादरतां । मनीं वसे ॥२५५॥**

**मराठी अर्थ** - म्हणून अर्जुना, वेदांच्या अर्थवादामध्ये मग्न झालेल्या त्या लोकांच्या मनात पूर्णपणे ही दुर्बुद्धि वास करत असते हे लक्षात ठेव.

**गुह्यार्थ** - सदबुद्धीवादी: विवेकी पुरुष हे महावाक्याच्या बोधाने मूळ धर्म जाणतात, तर दुर्बुद्धिवादी लोक हे कर्मकांड व मायेच्या पाशामध्ये अडकून धर्म विसरतात.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - दुसरा, ओवी - २५९
**तूं गुणत्रयातें अव्हेरीं । मी माझें हें न करीं ।**
**एक आत्मसुख अंतरीं । विसंब झणीं ॥२५९॥**

**मराठी अर्थ -** तू तिन्ही गुण टाकून दे, मी व माझेपण धरू नकोस (पण) अंत:करणात फक्त एका आत्मसुखाचा विसर पडू देवू नकोस.

**गुह्यार्थ -** परमेश्वर जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, मी व माझेपणा या मायेच्या पाशामध्ये न अडकता जी सत्य अशी आत्मस्थिती आहे, तिचा विसर पडू देऊ नको, ही स्थिती गुणातीत अशी आहे. ही स्थिती अनुभवताना संत गोराकुंभार असे म्हणतात -

**"निर्गुणाच्या भेटी गेलो गुणासंगे आणि झालो गुणातीत"**

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - दुसरा, ओवी - २९५

**अर्जुना तयाचां ठायीं । कामक्रोधु सहजें नाहीं ।**
**आणि भयातें नेणें कहीं । परिपूर्ण तो ॥२९५॥**

**मराठी अर्थ -** अर्जुना, त्याच्या ठिकाणी स्वभावत:च काम, क्रोध नसतात आणि त्याला भय हे केव्हाच माहीत नसते, (असा) तो परिपूर्ण होय.

**गुह्यार्थ -** परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात, परिपूर्ण पुरुष म्हणजे जो तत्वमसि महावाक्याचा बोध घेऊन आत्मस्थिती जाणतो व ज्याला काम, क्रोध (इडा, पिंगळा) याचे भय राहत नाही, अशा स्थितप्रज्ञ पुरुषाला नमन करताना ज्ञानेश्वर माऊली असे म्हणतात -

**“ब्रम्हज्ञानी पुरुष तोचि ओळखावा**
**नयनांजनी (ब्रम्हरंध्र) ठसा पहावा,**
**देखता तयासि नमन माझे.”**

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - दुसरा, ओवी - ३२७
**ऐसा स्मृतिभ्रंशु घडे । मग सर्वथा बुद्धि अवघडे ।**
**तेथ समूळ हें उपडे । ज्ञानजात ॥३२७॥**

**मराठी अर्थ -** अशा रीतीने स्मृतिला भ्रंश झाला, म्हणजे मग बुद्धीची सर्व प्रकारे कुचंबणा होते, त्या प्रसंगी जेवढे म्हणून ज्ञान आहे, तेवढे सर्व समूळ नष्ट होते.

**गुह्यार्थ -** मुळची निराकार आत्मस्थिती जीव ज्यायोगे विसरतो, ते म्हणजे मायेच्या पाशाने सर्व कर्मकांडे करून जीव दशेत अडकतो व मूळ ज्ञानाचा नाश करवून घेतो.

रामदास महाराज दासबोध मध्ये असे सांगतात,
**ऐक ज्ञानाचें लक्षणं । ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान ।**
**पाहावें आपणासि आपण। या नांव ज्ञान ।।१।।**

# अध्याय - तिसरा

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - तिसरा, ओवी - १

**मग आइका अर्जुनें म्हणितलें । देवा तुम्हीं जें वाक्य बोलिले ।**
**तें निकें म्यां परिसलें । कमळापती ॥१॥**

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - तिसरा, ओवी - २

**तेथ कर्म आणि कर्ता । उरेचिना पाहतां ।**
**ऐसें मत तुझें अनंता । निश्चित जरी ॥२॥**

**मराठी अर्थ -** मग अर्जुन म्हणाला, श्रीकृष्णा ऐका, देवा तुम्ही जे काही बोललात ते हे कमलापती मी चांगले ऐकले श्रीअनंता तुमच्या मागील व्याख्यानाचा विचार करून पाहिला असता (१) त्या ठिकाणी कर्म आणि त्याचा कर्ता हे उरतच नाहीत व हेच जर तुझे मत निश्चित असेल तर मग श्रीकृष्णा अर्जुना, तू युद्ध कर असे मला कसे सांगतोस? (२)

**गुह्यार्थ -** (ओवी क्रमांक १ आणि २ मिळून) परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, ब्रम्हस्थितीत असताना जे कर्म अभ्यास होतो त्यास निष्काम कर्म म्हणतात तिथे कर्म आणि कर्ता उरतच नाही. तर अर्जुना जीवास्थितीतील कर्मास जे सकाम कर्म आहे जो ईश्वर बुद्धीच्या वाटे जीवाकडून करवून घेतात त्यातून सुख व दुख निर्माण होते त्यास सर्व कर्म असे म्हणतात.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - १०
**मी आधींचि कांही नेणें । वरी कवळिलों मोहें येणें ।**
**कृष्णा विवेकु या कारणें । पुसिला तुज ॥१०॥**

**मराठी अर्थ** - मला अगोदरच काही समजत नाही त्यात या भ्रमाणे मला घेरले आहे म्हणून श्रीकृष्णा, तुला सारासार विचार पुसला.

**गुह्यार्थ** - जीवाचा भ्रम केला गेला मी देह असा व ईश्वराने त्याला जीवदशा लावली श्वासाच्या योगे व या दशेने सुख व दुखच निर्माण होते आणि हा जीवाचा भ्रम म्हणजेच असंख्य अज्ञान होय म्हणूनच परमात्मा म्हणतो, हा सारासार विचार करून मी तुम्हास सत्य व ज्ञान काय म्हणजेच ब्रम्हवाक्याच्या बोधाने अज्ञान / असत्य दूर करा.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - ३१
**तरी पारत्रिकीं हित । आणि आचरितां तरी उचित ।**
**ते सांगें एक निश्चित । पार्थु म्हणे ॥३१॥**

**मराठी अर्थ** - तर मग परलोकी कल्याणकारक आणि (इहलोकी) आचरण्याला तर योग्य असे जे असेल ते एक मला निश्चित करून सांग असे अर्जुन म्हणाला.

**गुह्यार्थ** - इहलोकी जीवस्थितीत आचरणाला योग्य असे म्हणजे देवोदुर्लभ मनुष्य जन्म कशासाठी मिळाला आहे? व त्या मनुष्य जन्माची पात्रता परमात्म्याने कशासाठी केली आहे? त्याचे

वचन काय हे जाणून घेण्यासाठी स्वधर्म समजून घेणे म्हणजेच जीवस्थितीतून आत्मस्थितीत जाण्यासाठी सद्‌गुरू कृपेने महावाक्याचा बोध घेणे होय. हा स्वधर्म कर असे परमात्मा म्हणतात. परलोकी कल्याणकारक म्हणजे आत्मस्थितीत अभ्यासाने हातवटी आणून जन्म - मरणाच्या फेऱ्यातून मुक्त होऊन हिरण्यगर्भ अवस्थेतील देहामध्ये पोहोचणे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - ३४

**तो उद्देशु तूं नेणसीचि । म्हणौनि क्षोभलासि वायांचि ।**
**तरी आतां जाण म्यांचि । उक्त दोन्ही ॥३४॥**

**मराठी अर्थ** - तो आमच्या प्रतिपादनाचा हेतु हे जाणलाच नाहीस, म्हणून उगीच रागावला आहेस; तर आता ध्यानात ठेव की, हे दोनही मार्ग मीच सांगितले आहेत.

**गुह्यार्थ** - परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, मी तुझी जी मनुष्य म्हणून पात्रता का निर्माण केली? हे न जाणताच तू रागावला, तर हे जाण की, जे उपजत व मुळापासून चालत आलेले दोन मार्ग ते असे -

(१) कर्मयोग - म्हणजे महावाक्याचा बोध जाणून घेणे निष्काम कर्म होय.

(२) ज्ञानयोग - म्हणजे अभ्यासाने अनुभव घेणे हे जाणण्याची पात्रता फक्त तुलाच आहे. इतर जीव हे जाणू शकत नाहीत. दोन मार्ग नसून एकाच नाण्याच्या दोन बाजू होत.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - ५८
**हें न ठकेचि जरी कांही । तरी सांडिले तें कायी ।**
**म्हणौनि कर्मत्यागु नाही । प्रकृतिमंतां ॥५८॥**

**मराठी अर्थ** - हे जर काही राहत नाही, तर मग त्याग तो काय केला? म्हणून शरीराच्या आश्रयाने असणाऱ्यांना कर्मत्याग (केव्हाही) घडत नाही.

**गुह्यार्थ** - परमात्मा असे म्हणतात की, हा ईश्वर जीवाकडून बुद्धीच्या वाटे देहाकडून करवून घेणारी म्हणजेच शरीराच्या आश्रयाने केलेली कर्मे नामस्मरण, तीर्थाटन, भंडारखाना, योग, याग म्हणजेच सर्व कर्म जरी निष्काम भावनेने केली तरी त्यातून पाप - पुण्य व सुख - दु:खच निर्माण होणारच मग त्यात त्याग तो काय?

तर कर्मत्याग तेव्हा होतो जेव्हा जीव जीवस्थितीतून सद्गुरू कृपेने महावाक्याच्या बोधाने आत्मस्थिती अनुभवतो. हे निष्काम कर्म तोच खरा कर्मत्याग आणि तेच खरे वैराग्य होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - ७६
**तूं मानसा नियमु करीं । निश्चळु होय अंतरी ।**
**मग कर्मेंद्रियें हीं व्यापारीं । वर्ततु सुखें ॥७६॥**

**मराठी अर्थ** - तू मनाला आवरून धर व अंत:करणात स्थिर हो, मग ही कर्मेंद्रिये आपापले व्यवहार करीत खुशाल राहू देत.

**गुह्यार्थ** - परमात्मा जीवाला उपदेश करताना म्हणतात की, तू सद्गुरू कृपेने तत्वमसि अभ्यासाने आत्मस्थिती अनुभव म्हणजेच तू मनावर म्हणजेच श्वासावर म्हणजेच मायेवर विजय मिळवशील. हा अभ्यास श्वासाला, कर्मकांडाला, देहाला व नामाला धरून नाही तसेच जीवस्थितीतला नसून ब्रम्हस्थितीतील आहे. ही स्थिती प्राप्त केल्यानंतर जीवस्थितीतिल प्रारब्धाणे होणाऱ्या कर्माला तू फक्त साक्षीदार राहशील आणि त्याचे परिणाम (सुख - दु:ख) तुझ्यावर होणारच नाहीत.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - १०१

**तैसें सर्व सुखेंसहित । दैवचि मूर्तिमंत ।**
**येईल देखा काढत । तुम्हांपांठी ॥१०१॥**

**मराठी अर्थ** - पहा, त्याप्रमाणे सर्व सुखासह मूर्तीमंत दैवच तुमच्या मागे शोध काढीत येईल.

**गुह्यार्थ** - परमात्मा असे म्हणतात, मनुष्य म्हणून तुझी पात्रता मी ज्या कारणासाठी केली आहे, ती जर तू सद्गुरू कृपेने जानून जीवस्थितीतून, आत्मस्थितीद्वारे मजप्रत येण्याचा प्रयत्न करशील तर या अभ्यासाने तू प्रारब्ध कर्म बदलशील. म्हणजेच सुखासह मूर्तीमंत दैवच तुमच्या मागे शोध काढत येईल.

संत एकनाथ महाराज म्हणतात -

**"एका जनार्दनी भोग प्रारब्धाचे,**
**हरि कृपे त्याचा नाश केला."**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - ११७

**जैसें जळचरां जळ सांडे । आणि तत्क्षणीं मरण मांडे ।**
**हा स्वधर्मु तेणें पाडें । विसंबों नये ॥११७॥**

**मराठी अर्थ** - ज्याप्रमाणे माशांना पाण्याचा वियोग झाला की, त्याच क्षणी मरण येते, त्याप्रमाणे स्वधर्माचरणाच्या त्यागाने मनुष्याचा नाश होतो, म्हणून त्याने या स्वधर्माला सोडू नये.

**गुह्यार्थ** - परमात्मा असे म्हणतात की, स्वधर्म म्हणजे हा मनुष्य जन्म कशासाठी मिळाला आहे? त्याची पात्रता कशासाठी केलेली आहे? या जन्माचे वचन काय आहे? हे जाणून घे व जीवस्थितीतून आत्मस्थितीत जाण्यासाठी सद्‌गुरू कृपेने महावाक्याचा बोध घे हा स्वधर्म होय आणि हा देवोदुर्लभ मनुष्य जन्मात हे जाणले नाही. स्वधर्म केला नाही तर जसा पाण्याविना मासा जगत नाही तसा स्वधर्माच्या त्यागाने मनुष्य जन्माचा नाश होतो म्हणजेच तो जीवस्थितीत मायेच्या पाशाने अडकून राहतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - १५५

**देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले ।**
**तयाही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥१५५॥**

**मराठी अर्थ** - पहा, मिळवावयाचे ते ज्यांनी मिळवले व म्हणून जे निरिच्छ झाले त्यांना देखील लोकांना वळण लावण्याकरिता कर्म करणे प्राप्त आहे.

**गुह्यार्थ** - ब्रम्हवाक्याचा बोध झालेले म्हणजेच सद्‌गुरूंनी जी आत्मस्थिती प्राप्त करून निष्काम कर्मयोग साधला आहे. त्यांनी देहधारी जीवाला त्याचे मी देह हे अज्ञान दूर करण्यासाठी परमात्म्याचा भूतलावरील अवतार म्हणून मार्गदर्शन करण्यासाठी व जीवाला मायेच्या भवसागरातून पार करण्यासाठी सद्‌गुरू म्हणून अवतारीत व्हावे लागते.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - १७९

**ऐसा अहंकारादि रूढ । एकदेशी मूढ ।**
**तया हा परमार्थ गूढ । प्रगटावा ना ॥१७९॥**

**मराठी अर्थ** - अशा रीतीने देहाहंकार धरणारा व स्वत:स मर्यादित समजणारा जो मूर्ख त्यास हे गूढ तत्त्वज्ञान उघड करू नये.

**गुह्यार्थ** - ईश्वर बुद्धीच्यायोगे जिवाकडून जी चांगली - वाईट कर्मे करून घेतात, त्यातून सुख - दु:खच निर्माण होऊन तो जीव बुद्धीवाटे अहंकारी होतो. जो स्वधर्म जाणण्यास तयार नाही अशा मूर्खासमोर ब्रम्हवाक्याचा बोध सांगू अथवा उघड करू नये.

**गुह्य करू नये प्रगट,**
**मोडील भक्तीची वाट**
**संत कोपतील.**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - १८४
**एथ कर्मी तोचि लिंपे । जो गुणसंभ्रमें घेपे ।**
**प्रकृतिचेनि आटोपें । वर्ततु असे ॥१८४॥**

**मराठी अर्थ** - या जगात तो प्रकृतीच्या तावडीत सापडून गुणांना वश होऊन वागतो, तो कर्मात बद्ध होतो.

**गुह्यार्थ** - सत्व, रज, तम या गुणांच्या योगे इंद्रिये जो व्यापार करतात त्या गुणांच्या योगे झालेल्या कर्माचा कर्तेपणा जो जीव मी म्हणून आपल्याकडे घेतो, तो या मायेच्या पाशातच अडकतो. हे सर्व कर्म होय. तर आत्मस्थितीतिल ही गुणातीत, निष्काम कर्म होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तिसरा**, ओवी - २७१
**तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मीचें स्वराज्य आलें ।**
**मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ॥२७१॥**

**मराठी अर्थ** - तसे कामक्रोध जर नि:शेष गेले तर ब्रम्हप्राप्तीरूप स्वराज्य मिळाले असे समज. मग तो पुरुष आपणच आपले सुख उपभोगीतो.

**गुह्यार्थ** - परमात्मा असे म्हणतात, ज्यावेळी मनुष्य जीवस्थितीतून गुणातीत होईल म्हणजेच आत्मस्थितीत महावाक्याच्या बोधाने जाईल तो ब्रम्हप्राप्तीरूप स्वराज्य मिळवेल व तो या आत्मस्थितीतील अवस्थेतच परमात्म्याप्रत जाण्याच्या सोऽहंच्या (सो म्हणजे आत्मा आणि ऽहं म्हणजे मी) मार्गात आनंद उपभोगतो.

# अध्याय - चौथा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौथा**, ओवी - १४
**तें हा निजस्वरूप । अनादि निष्कंप ।**
**परी कवणे मानें सकृप । जाहला आहे ॥१४॥**

**मराठी अर्थ** - अशी जी आत्मस्थिती, तद्रूप असणारा हा श्रीकृष्ण मूळचाच अचल आहे; पण (आज या अर्जुनावर) किती बरे कृपावंत झाला आहे!

**गुह्यार्थ** - परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, ही जी माझी आत्मस्थिती योगींना सापडत नाही, वेदांच्या अर्थांना सापडत नाही, ध्यानाचीही नजर येथपर्यंत पोहचत नाही, जी निराकार आहे, अशी जी आत्मस्थिती फक्त देवोदुर्लभ अशा मनुष्याला अभ्यासाने प्राप्त होऊ शकते आणि या मनुष्य जन्मावर परमात्म्याचे निरूपम प्रेम आहे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौथा**, ओवी - ३१
**तरी नावेक हें सहावें । गाजाबज्यही न धरावें ।**
**परी तुझें अज्ञानत्व हरावें । लागे आधीं ॥३१॥**

**मराठी अर्थ** - तरी क्षणभर ते बाजूला ठेवून, या गडबडीचाही विचार मनात न आणता पहिल्याने तुझे अज्ञान घालवून टाकले पाहिजे.

**गुह्यार्थ -** परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, प्रपंचाचा सगळा भार विषय वासनेवर व देहावर आहे. मी देह व देहासंबंधी माझे या अज्ञानामुळे तो आत्मज्ञान विसरला आहे. जीवाला वैराग्य म्हणजे काय? माहीत नाही; तसेच विवेक म्हणजे काय? हेही माहीत नाही आणि हे अज्ञान काढले तरच तू तुझ्या मूळ स्थितीप्रत पोहचशील व आत्मज्ञान जाणशील.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **चौथा**, ओवी - ५८

**माझे अजत्वें जन्मणें । अक्रियताचि कर्म करणें ।**
**हें अविकार जो जाणे । तो परममुक्त ॥५८॥**

**मराठी अर्थ -** मी माझे अजत्व कायम ठेवून जन्मतो, अक्रिय असूनही कर्मे करतो, हे माझे अलिप्तत्व जो जाणतो तोच श्रेष्ठ प्रतीचा मुक्त होय.

**गुह्यार्थ -** परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, जो मनुष्य महावाक्याचा बोध घेतलेला ज्ञानी आत्मस्थितीतला आहे, तो माझे अजत्व जाणतो, अलिप्तत्व जाणतो, तो देहधारी असूनही देहभावाला वश होत नाही; तोच श्रेष्ठ प्रतीचा मुक्त होय. ती मुक्ती म्हणजे कैवल्य देहाची कैवल्य मुक्ती होय.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **चौथा**, ओवी - ६२

**जे तपोतेजाचिया राशी । कां एकायतन ज्ञानासी ।**
**जे पवित्रता तीर्थांसी । तीर्थरूप ॥६२॥**

अध्याय - **चौथा**, ओवी - ६३

**ते मद्भावा सहजें आले । मी तेचि ते होऊनि ठेले ।**
**जे मज तयां उरले । पदर नाहीं ॥६३॥**

**मराठी अर्थ -** जे तपाच्या तेजाचे पुंज असतात किंवा जे ज्ञानाचे केवळ एकच ठिकाण असतात, जे तिर्थांना पवित्रता देणारे, फार काय, जे मूर्तीमंत तीर्थच असतात. (६२) ते सहजच माझ्या स्वरूपाला मिळतात, ते मीच होऊन राहतात, कारण त्यांच्यात व माझ्यात मग पडदाच उरत नाही. (६३)

**गुह्यार्थ -** (ओवी क्रमांक ६२ आणि ६३ मिळून) परमात्मा असे म्हणतात की, जो पुरुष / मनुष्य तत्वमसि महावाक्याचा बोध सद्गुरूकृपेने घेतात ते म्हणजे तेजाचे पुंज. ज्ञानाचे राहण्याचे ठिकाण, तिर्थांना पवित्रता देणारे मूर्तीमंत तीर्थच असतात व ते मजप्रत येतात. मग आम्हा दोघात आमच्यात मायेचा पडदाच उरत नाही.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौथा**, ओवी - ६८

**परी ज्ञानेंवीण नाशिले । जे बुद्धिभेदासि आले ।**
**तेणेंचि त्या कल्पिलें । अनेकत्व ॥६८॥**

**मराठी अर्थ -** पण ज्ञान नसल्यामुळे त्यांचे सर्व बिघडले. ते असे की, त्यांच्या ठिकाणी भेदबुद्धी उत्पन्न होते. त्यामुळे, मी जो एक, त्या माझ्या ठिकाणी ते अनेकत्वाची कल्पना करतात.

**गुह्यार्थ** - परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, बुद्धीवादी जीव जे मायेच्या पाशाने देहाला धरून कर्म करतात, त्यांच्या ठिकाणी द्वैत व भेदबुद्धी उत्पन्न होते. जो एक आहे त्याची अनेकत्वाची कल्पना करतात. जो नाम रहित आहे, त्याचे नामस्मरण करतात, म्हणूनच भेदबुद्धीला वश होऊन घोटाळ्यात पडतात, हेच जीवाचे अज्ञान होय.

हे अज्ञान नाहीसे होणे म्हणजे ज्ञान. म्हणून समर्थ रामदास म्हणतात -

**ऐक ज्ञानाचे लक्षण । ज्ञान म्हणजे आत्मज्ञान ।**
**पहावे आपणाशी आपण । या नाव ज्ञान ।**

हे ज्ञान सद्‌गुरू कृपेमुळे ब्रम्हवाक्याच्या बोधाने होऊ शकते. म्हणजेच अज्ञान नाहीसे होते.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौथा**, ओवी - ७२
**तेथ जें जें अपेक्षित । तें तैसेंचि पावती समस्त ।**
**परी तें कर्मफळ निश्चित । वोळख तूं ॥७२॥**

**मराठी अर्थ** - मग जे जे (त्यांच्या) मनात असते ते ते सगळे त्यांना प्राप्त होते. पण ते केवळ त्यांच्याच कर्माचे फळ आहे हे तू निश्चयाने समज.

**गुह्यार्थ** - जो मनुष्य त्याचे विद्यमान जीवन जगत असतो, ते म्हणजे त्याचे प्रारब्धाचे फलित होय. त्या प्रारब्धाचे फळ त्या विद्यमान जीवनात भोगत असतो व ते भोगताना जे पाप - पुण्य करतो ते संचित पुढील जन्माचे फेडणे आणि भोगणे होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौथा**, ओवी - १०५

**ज्ञानाग्निचेनि मुखें । जेणें जाळिली कर्मँ अशेखें ।**
**तो ब्रह्मचि मनुष्यवेखें । वोळख तूं ॥१०५॥**

**मराठी अर्थ** - ज्ञानरूपी अग्नीच्या द्वारा ज्याने सर्व कर्मे जाळून टाकली आहेत, तो मनुष्याचे रूप घेतलेले प्रत्यक्ष ब्रम्हच आहे असे तू समज.

**गुह्यार्थ** - परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, देहबुद्धीच्या योगे मायेच्या पाशात अज्ञानी मनुष्य जी कर्मे करतो, त्याला सर्वकर्म म्हणतात. त्यातून सुख व दु:खच निर्माण होते. हे सर्व देहाला व श्वासाला म्हणजेच मायेला धरून होय आणि हेच अज्ञान नाश करण्यासाठी परमात्म्याने देवोदुर्लभ हा मनुष्य जन्म दिला आहे. त्याचे वचन काय आहे हे सद्‌गुरू कृपेने महावाक्याच्या बोधाने जीवस्थितीतून आत्मस्थितीत जाणे आणि आत्मस्थितीतील साधना म्हणजेच अभ्यास होय आणि तेच निष्काम कर्म होय, म्हणूच या ओवीमध्ये ज्ञानी मनुष्य ज्ञानरूपी अग्निच्या द्वारा म्हणजेच अभ्यासाद्वारे सर्व कर्मे जाणतो, असे म्हटले आहे. म्हणूनच अभ्यासक ज्ञानी मनुष्य जीवस्थितीतील कर्माला फक्त साक्षीभूत असतो व तो दोन्ही अवस्थेतील जीव व आत्मस्थिती उच्चकोटीचा मनुष्य होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौथा**, ओवी - ११३

**हा मत्सरु जेथ उपजे । तेतुले नुरेचि जया दुजें ।**
**तो निर्मत्सरु काइ म्हणिजे । बोलवरी ॥११३॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौथा**, ओवी - ११४

**म्हणौनि सर्वांपरी मुक्तु । तो सकर्मुचि तो कर्मरहितु ।**
**सगुण परि गुणातीतु । एथ भ्रांति नाहीं ॥११४॥**

**मराठी अर्थ** - हा मत्सर ज्या द्वैतापासून उत्पन्न होतो, ते द्वैत ज्याच्या ठिकाणी मुळीच उरलेले नसते, तो निर्मत्सर आहे. हे काय शब्दाने बोलून दाखविले पाहिजे? (११३) म्हणून तो सर्व प्रकारे मुक्त आहे, कर्म करीत असताही कर्मरहित आहे, गुणयुक्त असूनही गुणातीत आहे यात संशय नाही. (११४)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक ११३ आणि ११४ मिळून) परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, जो अज्ञानी मनुष्य आहेत म्हणजेच मायेने व श्वासाला घेऊन कर्म व साधना करतात म्हणजे इडा - पिंगळाद्वारे साधना करतात. श्वासायोगे देहाला धरून होणारी सर्वकर्मे म्हणजेच द्वैत आणि मत्सर होय व जो ज्ञानी मनुष्य अभ्यासाद्वारे करणारे निष्काम कर्म करतो तो जीवस्थितीत गुणयुक्त असूनही गुणातीत होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौथा**, ओवी - १६५

**तें ज्ञान पैं गा बरवें । जरी मनीं आथि आणावें ।**
**तरी संतां यां भजावें । सर्वस्वेंशीं ॥१६५॥**

**मराठी अर्थ** - अरे अर्जुना, ते उत्तम ज्ञान जर लाभवे असे मनात असेल, तर या संतास सर्वस्वे करून तू भजावेस.

**गुह्यार्थ** - परमात्मा संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांच्या योगे असे म्हणतात की, जे श्रेष्ठ असे ज्ञान आहे ते म्हणजे कोणते? तर सद्‌गुरू कृपेने महावाक्याचा बोध घेऊन आत्मस्थितीचा अनुभव घेऊन परमात्म्याप्रत जाणे होय. श्वासाला - उच्छ्वासाला शांत करणे म्हणजेच संत, म्हणजेच आत्मस्थिती, म्हणजेच अंगुष्ठाण, म्हणजेच अभ्यास होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौथा**, ओवी - १७१

**ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल। तैं मोहांधकारू जाईल।**
**जैं गुरुकृपा होईल। पार्था गा॥१७१॥**

**मराठी अर्थ** - अरे पार्था, ज्यावेळी श्रीगुरूंची कृपा होईल त्यावेळी असा ज्ञानप्रकाशाचा उदय होईल आणि मग त्यावेळी मोहरुपी अंधकार नाहीसा होईल.

**गुह्यार्थ** - माऊली असे सांगतात की, ज्या मनुष्यावर गुरूकृपा होईल त्याच्यावर ज्ञानप्रकाश होईल, अज्ञान नाहीसे होईल. त्याचा मोहाधंकार म्हणजेच मायेच्या पाशात अडकलेला जीव श्वासाच्या योगे होणाऱ्या सर्व कर्मापासून अलिप्त होऊन अभ्यासायोगे निष्काम कर्म करून मनुष्य जन्माचे सार्थक होईल व अज्ञानाचा अंधकार नाहीसा होईल.

# अध्याय - पाचवा

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **पाचवा**, ओवी - ६

**परी मागील असो देवा। आतां प्रस्तुतीं उकलु देखावा।**
**सांगे दोहींमाजि बरवा। मार्गु कवण ॥६॥**

अध्याय - **पाचवा**, ओवी - ७

**जो परिणामींचा निर्वाळा। अचुंबितु ये फळा।**
**आणि अनुष्ठितां प्रांजळा। सावियाचि ॥७॥**

**मराठी अर्थ -** परंतु देवा, मागे झाले ते राहू द्या. आता या वेळी उलगडा करा आणि या दोन मार्गांपैकी चांगला कोणता आहे ते सांगा. (६) ज्याचा शेवट शुद्ध असून ज्याचे फळ अचूक प्राप्त होते व ज्याचे अनुष्ठान सहजच सरळ आहे. (७)

**गुह्यार्थ -** (ओवी क्रमांक ६ आणि ७ मिळून) अर्जुनाची कर्माच्या बाबतीत द्विधा मन:स्थिती झाली आहे म्हणून ते परमात्म्याला प्रश्न करतात, तुम्ही कर्म कराही म्हणता व त्यागाही म्हणता; परंतु या दोन मार्गांपैकी एक मार्ग ज्याचा शेवट शुद्ध असून फळ अचूक आहे व ज्याचे अनुष्ठान सरळ आहे तो एक मार्ग सांगा.

नाना साधने उधारीची हा ब्रम्ह साक्षात्काराचा रोकडा

'आकाश मार्ग गुप्त पंथ' योगिचे जाणते समर्थ इतरांस हा गुह्यर्थ सहसा न कळे.

ज्ञानेश्वरी - अध्याय - पाचवा, ओवी - १६

**तरी जाणां नेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळा ।**
**जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणीं ॥१६॥**

**मराठी अर्थ** - तरीपण जाणते व नेणते, या सगळयांना, हा निष्काम कर्मयोग आचारण्याला सोपा आहे. ज्याप्रमाणे पाण्यातून तरुन जाण्याला, स्त्रियांना व बालकांना नाव (हे सुलभ साधन आहे.) त्याप्रमाणे (भवसागरातून तरून जाण्याला) हा कर्मयोग साधन आहे.

**गुह्यार्थ** - माऊली सांगतात, जाणीव - नेणीव सर्व प्राणी मात्रांना आहे; परंतु हा निष्काम कर्मयोग शुद्ध आहे. निर्गुण, निराकारी, अतिशुद्ध परमात्म्याप्रत पोहोचण्यासाठी व मायेच्या भवसागरातून तरून जाण्यासाठी निष्काम कर्मयोग (अभ्यास) हा एकमेव सुलभ मार्ग आहे.

ज्ञानेश्वरी - अध्याय - पाचवा, ओवी - ३२

**जो युक्तिपंथें पार्था । चढे मोक्षपर्वता ।**
**तो महासुखाचा निमथा । वहिला पावे ॥३२॥**

ज्ञानेश्वरी - अध्याय - पाचवा, ओवी - ३३

**येरा योगस्थिती जया सांडे । तो वायांचि गा हव्यासीं पडे ।**
**परि प्राप्ति कहीं न घडे । संन्यासाची ॥३३॥**

**मराठी अर्थ** - अर्जुना, जो निष्काम कर्म करण्याच्या हातवटीच्या रस्त्याने मोक्षरूप पर्वतावर चढतो, तो परमानंदरूपी शिखर त्वरेने गाठतो. (३२) याहून दुसरा ज्याच्या हातून कर्मयोगाचे

अनुष्ठान होत नाही तो व्यर्थच (संन्यासाच्या) छंदात पडतो; परंतु त्याला संन्यासाची प्राप्ती केव्हाच घडत नाही. (३३)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक ३२ आणि ३३ मिळून) अर्जुनाच्या कर्माविषयीच्या प्रश्नाला उत्तर देताना परमात्मा परमेश्वर म्हणतात की, सद्गुरू कृपेने व महावाक्याच्या बोधाने जे तत्वमसिचा अभ्यास करून आत्मस्थितीला प्राप्त होतात तोच खरा निष्काम कर्मयोग. तो एकच मार्ग निवड व त्याच्या हातवटीने परमानंदरूपी शिखर तू गाठशील व या उलट हा निष्काम कर्मयोग ज्या मनुष्याच्या हातून होत नाही त्याचा जन्म व्यर्थच. जे जीवस्थितीमध्ये संन्यासी म्हणून मिरवतात त्याला संन्यासाची प्राप्ती कधीच घडत नाही.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पाचवा**, ओवी - ३७

**आतां कर्ता कर्म करावें । हें खुंटलें तया स्वभावें ।**
**आणि करी जऱ्ही आघवें । तऱ्ही अकर्ता तो ॥३७॥**

**मराठी अर्थ** - आता कर्ता - कर्म - कार्य हा त्रिपुटीचा व्यवहार स्वभावत:च त्याच्या ठिकाणी बंद पडतो आणि यावर त्याने सर्व (कर्म) जरी केले तरी तो (तत्त्वत:) त्याचा कर्ता होत नाही.

**गुह्यार्थ** - ध्याता - ध्येय - धारणा या त्रिपुटीचा म्हणजेच मायेचा व्यवहार या निष्काम कर्मयोगाने म्हणजेच अभ्यासाने थांबतो आणि अशा अभ्यासू मनुष्याने जीवस्थितीत केलेल्या कर्मामध्ये तो स्थितप्रज्ञच असतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पाचवा**, ओवी - ६३

**अगा करितेनवीण कर्म । तेंचि तें निष्कर्म ।**
**हें जाणती सुवर्म । गुरुगम्य जें ॥६३॥**

**मराठी अर्थ** - अर्जुना, कर्तेपणाचा अहंकार टाकून केलेले जे कर्म, तेच नैष्कर्म्य होय. ही गुरुकडून कळणारी मर्माची गोष्ट (प्राप्त पुरुष) समजतात.

**गुह्यार्थ** - परमात्मा अभ्यासाचे म्हणजेच स्वधर्माचे महत्त्व सांगताना असे म्हणतात, जीवस्थिती म्हणजेच मायेला सोडून आत्मस्थितीत जो अभ्यास कराल तेच निष्काम कर्म होय आणि हेच खरे कर्म तुम्हाला सद्‌गुरूकडून प्राप्त होऊ शकते.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पाचवा**, ओवी - १५६

**जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरुपु पटु फाटे ।**
**जैसें सरोवर आटे । मग प्रतिमा नाहीं ॥१५६॥**

**मराठी अर्थ** - ज्या ठिकाणी हे संसाररुपी चित्र उमटते तो मनोरूपी पडदा फाटून जातो. ज्याप्रमाणे सरोवर आटले म्हणजे प्रतिबिंब नाहीसे होते.

**गुह्यार्थ** - ज्यावेळी मनुष्य सद्‌गुरू कृपेने आत्मस्थितीला अभ्यासाने प्राप्त होतो; त्यावेळी जी जिवस्थिती म्हणजे मायेचा पडदा फाटतो व मनुष्य संत होतो म्हणजे देवत्व प्राप्त होते (अंगुष्ठाण) जिवदशा नाहीशी होते.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पाचवा**, ओवी - १६५

**एऱ्हवीं तरी अवधारा । जो दाविला तुम्हीं अनुसारा ।**
**तो पव्हण्याहूनि पायउतारा । सोहपा जैसा ॥१६५॥**

**मराठी अर्थ** - देवा ऐका, तुम्ही जो मार्ग दाखविला, तो पोहून जाण्यापेक्षा पायउताराने जाणे बरे.

**गुह्यार्थ** - परमात्मा मार्गदर्शन करताना अर्जुनाच्या माध्यमातून असे सांगतात की, हा निष्काम कर्मयोगाचा मार्ग हटयोगाने करण्यापेक्षा साध्या प्रपंचातून परमार्थ केलेला सोपा. याचे रूपक घेताना ते म्हणतात की, पोहण्यापेक्षा पायउताराने जाणे बरे.

**तुका म्हणे आम्हा धाडीले निरोपा**
**मार्ग हा सोपा आणि सुखकर**

# अध्याय - सहावा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - २४
**येथ श्रवणाचेनि पांगे- । वीण श्रोतयां व्हावें लागे ।**
**हे मनाचेनि निजांगें । भोगिजे गा ॥२४॥**

**मराठी अर्थ** - या मेजवानीकरिता श्रोत्यांना श्रवणेद्रियांचा पंगिस्तिपणा टाळावयास पाहिजे. ही मेजवानी मनाच्या अंतर्मुखतेने भोगावयाची आहे.

**गुह्यार्थ** - परमात्मा उपदेश करताना असे म्हणतात की, बहिर्मुखातून म्हणजेच माया विरहित अंतर्मुख झाला तर परमानंदाची तृप्ती तुम्हाला होऊ शकते. हे केव्हा तर सद्गुरू कृपेने आत्मस्थिती प्राप्त करण्याच्या अभ्यासाने साध्य होऊ शकते.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - २६
**ऐसें हळुवारपण जरी येईल । तरीच हें उपेगा जाइल ।**
**एरव्हीं आघवी गोठी होईल । मुकिया बहिरयाची ॥२६॥**

**मराठी अर्थ** - याप्रमाणे चित्ताला जर हळुवारपणा येईल, तरच माझ्या निरुपणाचा उपयोग होईल. नाहीतर मुक्या बहिऱ्यांच्या गोष्टीसारखा सर्व प्रकार होईल.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, सद्गुरू कृपेने तुम्ही जीवस्थितीतून आत्मस्थिती प्राप्त करत असताना अभ्यासायोगे

तुम्ही ज्या अंतिम अवस्थेत पोहचाल तेथे चित्त म्हणजेच श्वास व त्याला चित करणे म्हणजे अंगुष्ठाण होणे, तद्वत देवत्व प्राप्त होणे होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - ३२
**ते बुद्धीही आकळितां सांकडें । म्हणौनि बोलीं विपायें सांपडे।**
**परि निवृत्तिकृपादीपउजियेडें । देखेंन मी ॥३२॥**

**मराठी अर्थ** - ते बुद्धीलादेखील आकलन करण्यास कठीण आहे. म्हणून शब्दांनी ते क्वचितच सांगता येईल. तरीपण माझे गुरु निवृत्तीनाथ यांच्या कृपारूपी दिव्यांच्या उजेडाणे मी ते पाहिन.

**गुह्यार्थ** - हे गीतारूपी ग्रंथाच्या भांडारात जे आत्मज्ञान माऊलींनी ब्रम्हअवस्थेत सांगितले आहे, ते समजण्यास सद्गुरूकृपाच आवश्यक आहे.

- गुरुकृपेवीन नाही आत्मज्ञान।
- सद्गुरू वाचोनी सापडेना सोय, धरावे ते पाय आधि आधि।
- स्वामी म्हणे झाले कृतार्थ जीवन, सद्गुरू चरण उपाजीता।

म्हणून ज्ञानेश्वर माऊली म्हणतात, हे मी केवळ माझे सद्गुरू निवृत्ती यांच्यामुळे जाणू शकलो आणि त्या अंतिम सत्यापर्यंत पोहचू शकेल असे हे आत्मज्ञान बुद्धीला आकलनच होऊ शकत नाही.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - ३५
**तैसी सद्गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे ।**
**म्हणौनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥३५॥**

**मराठी अर्थ** - ज्याप्रमाणे जर सद्गुरूची कृपा होईल, तर प्रयत्न केला असता कोणती गोष्ट प्राप्त होणार नाही? ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझ्यावर ती (कृपा) अलोट आहे.

**गुह्यार्थ** - आपल्यावर सद्गुरू कृपा असल्यावर अशक्य ते काय असे आपण म्हणतो; पण ते लौकिकातील यश व प्राप्ती नव्हे तर सद्गुरू कृपेने आपणास जे ब्रम्हज्ञान / आत्मज्ञान आपणास मिळाले आहे त्यात पूर्णत्वास जाण्याकरिता सद्गुरूंनी आपणास स्वीकारले म्हणजे कृपा व दृष्टी म्हणजे जो अभ्यास दिला आहे तो पूर्णत्वास जाणेकरिता वाढवणे व त्यास अधिकाधिक पुष्टी देणे हीच सद्गुरूंची कृपादृष्टी होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - ६८

**पै व्यामोहाचिये शेजे । बळिया अविद्या निद्रित होइजे ।**
**ते वेळी दुःस्वप्न हा भोगिजे । जन्ममृत्यूंचा ॥६८॥**

**मराठी अर्थ** - अविवेकरूपी अंथरुणावर प्रबळ अविद्येच्या योगाने (ज्या वेळेला जीव) निजतो त्या वेळेला हे जन्ममरणरूपी वाईट स्वप्न तो अनुभवतो.

**गुह्यार्थ** - अज्ञानाच्या अंधकारात, जीवस्थितीला मायेच्या पाशाने जो मनुष्य चिकटून राहतो व त्या जीवस्थितीत जी कर्मकांड, योग, याग, तीर्थाटणे तसेच बुद्धीयोगे जी कर्मे करतो त्यातून निर्माण होणाऱ्या फळातून तो पुन्हा पुन्हा जन्म - मरणाच्या फेऱ्यात अडकतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - ८२

**जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरे तेंचि होये ।**
**तैसें जीवा ब्रम्हत्व आहे । संकल्पलोपीं ॥८२॥**

**मराठी अर्थ** - ज्याप्रमाणे हिणकस सोन्यातून मिसळलेल्या धातूचा दोष निघाला तर तेच शंभर नंबरी सोने होते. त्याप्रमाणे अहंकाराचा नायनाट झाला असता जीवाला ब्रम्हत्व ठेवलेलेच आहे.

**गुह्यार्थ** - केवळ आणि केवळ सद्‌गुरू कृपेने अज्ञानाचा नाश झाल्याने व उपजत असलेले ज्ञान म्हणजेच जीवाला ब्रम्हत्व आहे हे कळल्यावर त्यायोगे आपण आत्मस्थितीतील आनंद प्राप्त करू शकतो व त्यासाठी परमात्म्याने हा देवोदुर्लभ मनुष्य जन्म दिला आहे. त्याची महती कळवून घेऊन सद्‌गुरू योगे या मायेपासून वेगळे होऊन उपजत असलेल्या ज्ञानमार्गाने सर्वांनी आत्मस्थितीचा आनंद घ्यावा हीच इच्छा.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - ८८

**जो हा विज्ञानात्मकु भावो । तया विवरितां जाहला वावो ।**
**मग लागला जंव पाहों । तंव ज्ञान तें तोचि ॥८८॥**

**मराठी अर्थ** - अनुभवाला येणारे जे हे दृश्य जगत् त्याचा विचार करता, तो त्याच्या दृष्टीने मिथ्या ठरले व मग आपण कोण आहोत असे जेव्हा तो पहावयास लागला, तेव्हा ज्ञान तेच आपण आहोत, असे त्यास कळाले.

**गुह्यार्थ -** ज्यावेळी बुद्धीचा कीस पाडून या मायेमध्ये जे काही प्राप्त करतात, त्यानेही त्यांची तृष्णा (इच्छा) भागत नाही, म्हणजेच आत्मशांती लाभत नाही. त्यावेळी ही माया व जिवस्थिती जी सतत बदलते ती असत्य व मिथ्या (भ्रम) वाटू लागते, त्यावेळी तो मनुष्य स्वत:ला म्हणजे 'मी' ला शोधावयास जातो; पण ते अज्ञान दूर करण्यास सद्‌गुरू कृपा होणे आवश्यक आहे आणि मग सद्‌गुरू कृपेने 'मी' चा खुलासा केला असता असे समजेल की,

- **पहिला** 'मी' म्हणजे जिवस्थितीतील 'मी'
'मी' देह आहे हे म्हणजे 'अज्ञान'
- **दुसरा** 'मी' म्हणजे आत्मस्थितीतील 'मी'
ही ज्ञानाने झालेली ओळख
- **तिसरा** 'मी' म्हणजे अतिशुद्ध, अतिमहान तो परमात्मा
जो पहिल्या दोन 'मी' मध्ये येत नाही; पण हे त्याच्याच सत्तेने होते, म्हणजे आपण जीवस्थितीतील मीपणा, म्हणजेच माया, म्हणजेच श्वास यातून आत्मस्थितीतील 'मी' शोधून त्या अतिशुद्ध परमात्म्यापर्यंतच्या स्थितीप्रत प्राप्त होणे म्हणजेच खरा मी होणे होय.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **सहावा**, ओवी - ११३

**ऐकें द्वैताचा ठावोचि फेडी । ते ब्रह्मविद्या कीजेल उघडी ।**
**तरि अर्जुना पढिये हे गोडी । नासेल हन ॥११३॥**

**मराठी अर्थ** - ऐका, द्वैताचा ठावठिकाणा नाहीसा करणारे असे जे आत्मज्ञान, ते उघड - उघड व्यक्त केले तर अर्जुन मला आवडतो ही प्रेमाची गोडी खरोखर नाहीशी होईल.

**गुह्यार्थ** - मी व परमात्मा हे दोन आहेत हे जे अज्ञान म्हणजेच द्वैत. या द्वैताचा ठावठिकाणा नाहीसा करणारे असे जे आत्मज्ञान हे केवळ सद्‌गुरू कृपेनेच मिळू शकते व ते झाल्यावर अद्वैत आत्मस्थिती काय ते हे कळते.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - १४६

**जो जन्मसहस्रांचियासाठीं । इंद्रादिकांही महागु भेटी ।**
**तो आधीनु केतुला किरीटी । जे बोलुहि न साहे ॥१४६॥**

**मराठी अर्थ** - इंद्रादिकांनादेखील हजारो जन्म घेतले तरी त्याची भेट होणे दुर्लभ, तो (श्रीकृष्ण) अर्जुनाच्या किती अधीन झाला आहे! अर्जुन प्रश्न करीपर्यंत त्याला धीर धरवत नाही.

**गुह्यार्थ** - इंद्रादिक देव - देवतांनादेखील न लाभलेला हा अभ्यास (तत्वमसि) फक्त मनुष्य जन्मातच मिळणे शक्य आहे आणि परमात्म्याप्रत पोहोचण्यासाठी हाच एक अंतिम मार्ग उपलब्ध आहे. हा मार्ग समजून घेऊन मनुष्य जन्माचे सार्थक करावे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - २३६

**नासापुटौनि वारा । जो जातसे अंगुळे बारा ।**
**तो गचिये धरुनि माघारा । आंतु घाली ॥२३६॥**

**मराठी अर्थ** - दोन्ही नाकपुड्यातून बारा बोटे वाहत असलेल्या वायुला गच्च धरून त्यास आत मागे घालते.

**गुह्यार्थ** - अभ्यासाविषयी मार्गदर्शन करताना परमात्मा म्हणतात की, जीवस्थिती जो श्वासोच्छवास चालू आहे, तो बारा बोटे वाहत असतो. त्याची मर्यादा तर फुफ्फुसापर्यंत असते. त्याला सद्‌गुरू कृपेने व तत्वमसि अभ्यासाने प्राणाचा प्रणव करणे व कुंडलिनी अधोचे - ऊर्ध्वमुख होऊन बारा बोटांचा श्वास संथ करून अंतिमत: अंगुष्ठाण करणे ही तिची अंतिम स्थिती होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - २७८

**विसरोनि गेलों अर्जुना । जंव नाशु नाही पवना ।**
**तंव वाचा आथी गगना । म्हणौनि घुमे ॥२७८॥**

**मराठी अर्थ** - अर्जुना, पण ते असे नव्हे विसरून सांगण्याचेच राहिले, ते काय म्हणशील, तर जोपर्यंत वायुचा नाश झाला नाही, तोपर्यंत हृदयाकाशात शब्द असतो. म्हणून तो अनाहत शब्द घुमतो असे समज.

**गुह्यार्थ** - परमात्मा अभ्यासाविषयी सांगताना असे म्हणतात की, जोपर्यंत वायुचा (श्वासाचा) नाश म्हणजेच माया शून्य होत नाही. आपण अभ्यासायोगे जीवस्थितीतून आत्मस्थितीत परमेश्वराप्रत जातो व त्या अंतिमस्थितीत अंगुष्ठाण होते तेव्हा देवत्व येते व वायुचा नाश होतो. ही अभ्यासाची महती होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - २८८
**तेव्हां तरी शक्तीचि म्हणिजे । एऱ्हवीं तो प्राणु केवळ जाणिजे ।
आतां नाद बिंदु नेणिजे । कला ज्योती ॥२८८॥**

**मराठी अर्थ** - तेव्हा तरी शक्तीच म्हणतात; पण वास्तविक तो प्राणवायुच आहे असे समज. आता त्यास नाद, बिंदु, कला व ज्योती असे चारी धर्म नसतात.

**गुह्यार्थ** - सद्गुरू कृपेने अभ्यासायोगे आपण जो स्वधर्म करतो त्यावेळी आपण गर्भातील स्थिती प्राप्त करतो व कुंडलीनीचे अधोमुखाचे ऊर्ध्वमुख होते व शुद्ध प्राणवायुच चालतो. तेव्हा या अभ्यासात नाद, बिंदु, कला, ज्योती असे काहीच नसते, ते भ्रमित करणाऱ्या जीव स्थितीत, मायेत व शरीराला धरून करणाऱ्या योग - यागात होते.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - २९१
**पिंडे पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतीचा दंशु ।
परि दाऊनि गेला उद्देशु । महाविष्णु ॥२९१॥**

**मराठी अर्थ** - पिंडाने पिंडाचा ग्रास करणे (पंचमहाभूतांनी पंचमहाभूतांचा लय करावयाचा) हे आदिनाथ जे शंकर यांच्या अंतरंग खुणेचे मर्म आहे; परंतु हे मर्म श्रीविष्णू (श्रीकृष्ण) दाखवून गेले.

**गुह्यार्थ** - पंचमहाभूतांनी पंचमहाभूतांची आटणी करण्याचा हा नाथसंप्रदायाचा (आकाशमार्ग गुप्तपंथ) (तत्वमसिचा) अभ्यास भगवान शंकरांनी दाखविला व भगवान विष्णूने या मार्गाचा प्रसार केला.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सहावा**, ओवी - ४६१
**ऐसें नेणों काय आपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासें ।**
**समाधी घर पुसे । मानसाचें ।।४६१॥**

**मराठी अर्थ** - असे सहजच कसे काय होते हे समजले नाही. अभ्यास त्याला आपोआप येतो व समाधी त्याच्या मनाचे घर विचारीत येते.

**गुह्यार्थ** - सद्‌गुरू कृपेने अभ्यास घेतल्यानंतर तुम्ही अभ्यासात बसल्यावर तो आपोआप चालतो, म्हणजे परमात्मा हा अभ्यास आनंदाने करवून घेतात.

संत कबीर म्हणतात -
**ओठकंठ न हले जिव्हा स्मरेना राम**
**राम हमारा जप करे हम बैठे आराम**

# अध्याय - सातवा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सातवा**, ओवी - ७
**आतां अज्ञान अवघें हरपे । विज्ञान निःशेष करपे ।**
**आणि ज्ञान तें स्वरूपें । होऊनि जाइजे ॥७॥**

**मराठी अर्थ** - आता अज्ञान संपूर्ण नाहीसे होईल व प्रपंच पूर्णपणे बाधित होईल आणि ज्ञान आपण स्वत:च होऊन जाऊ.

**गुह्यार्थ** - अभ्यासाद्वारे अज्ञान संपूर्ण नाहीसे होऊन आपण स्वत:च ज्ञान होऊन जाऊ, तो अभ्यास म्हणजे सद्‌गुरू कृपेने तत्वमसि महावाक्याचा बोध घेणे होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सातवा**, ओवी - ८
**ऐसें वर्म जें गूढ । तें किजेल वाक्यारूढ ।**
**जेणें थोडेन पुरे कोड । बहुत मनींचें ॥८॥**

**मराठी अर्थ** - असे जे गूढ वर्म आहे, ते शब्दात आणले जाईल व त्याचा थोड्या प्रतिपादनानेच मनाचे पूर्ण समाधान होईल.

**गुह्यार्थ** - अभ्यासाविषयीचे हे जे गूढ वर्म आहे ते या ज्ञानेश्वरीमध्ये सद्‌गुरू कृपेने माऊलींनी ब्रम्हस्थितीतून मार्गदर्शित केले आहे.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय **- सातवा**, ओवी - ९७
**येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले ।**
**तयां ऐलीच थडिये सरलें । मायाजळ ॥९७॥**

**ज्ञानेश्वरी -** अध्याय **- सातवा**, ओवी - ९८
**जयां सद्गुरुतारूं पुढे । जे अनुभवाचिये कांसे गाढे ।**
**जयां आत्मनिवेदन तरांडे । आकळलें ॥९८॥**

**मराठी अर्थ -** या ठिकाणी जे सर्वभावाने मला भजले तेच एक ही मायानदी सहज तरुन गेले. त्यांना मायानदीच्या अलीकडच्या काठावर तिचे पाणी संपले. (९७) ज्यास सद्गुरू हा पुढे तारणारा (नावाडी) आहे, ज्या साधकांनी आत्मनुभवरूपी कासोटा घट्ट बांधला आहे व ज्यांना आत्मनिवेदरूपी ताफा प्राप्त झाला आहे. (९८)

**गुह्यार्थ -** (ओवी क्रमांक ९७ आणि ९८ मिळून) परमात्मा म्हणतात की, या ठिकाणी जो मनुष्य अभ्यासाने मला भजेल तो सहजच ही मायानदी पार करेल, पण ती केव्हा? जेव्हा सद्गुरू हा त्याचा नावाडी (तारणारा) होईल व त्या कृपेने तत्वमसि महावाक्याच्या बोधाच्या अभ्यासाने हे साध्य होईल.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय **- सातवा**, ओवी - १३०
**ऐसा शरीरसंयोगाचिये राती । माजीं धांवतां सडिया आयती ।**
**तंव कर्मक्षयाची पाहाती । पाहांट जाली ॥१३०॥**

**मराठी अर्थ -** याप्रमाणे देहतादात्म्यरूप रात्रीत सर्वसंगपरीत्यागरूपी तयारीने धावत असताना, कर्माच्या क्षयाची उजाडती पहाट झाली.

**गुह्यार्थ -** अशा प्रकारे या तत्वमसिच्या अभ्यासायोगे सद्‌गुरू कृपेने जी आत्मस्थितीत परमात्म्याप्रत जाणेचा सोऽहंचा मार्ग हे म्हणजेच निष्काम कर्म, तसेच हे साध्य झाल्यावर जीवस्थितीतिल कर्माचा क्षय झाल्यावरच हे निष्काम कर्म होते.

# अध्याय - आठवा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - २९

**ऐसा करितेनवीण गोचरू । अव्यक्तीं हा आकारू ।**
**निपजे जो व्यापारू । तया नाम कर्म ॥२९॥**

**मराठी अर्थ** - याप्रमाणे कर्त्याशिवाय अव्यक्ताच्या ठिकाणी (ज्याच्या योगे) हा भासमान होणारा आकार उत्पन्न होतो, असा जो व्यापार त्याला 'कर्म' हे नाव आहे.

**गुह्यार्थ** - जे केल्याशिवाय होत आहे (श्वास), जे आकाररहितव अव्यक्त आहे व इंद्रियाशी अगोचर (जाणीवरहित) आहे, त्याच्या देण्या - घेण्याचा जो व्यापार चालू आहे त्यालाच कर्म म्हणतात. त्याला धक्का न लावता (बदल न करता) बारा बोटे चालणाऱ्या श्वासाला अंगुष्ठाण करणे हे केवळ आकाशमार्ग गुप्तपंथ (तत्वमसि) या मार्गानेच शक्य आहे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - ५५

**देखा बालकाचिया धणी धाइजे । कां शिष्याचेनि जाहलेपणें होइजे ।**
**हें सद्गुरूचि एकलेनि जाणिजे । कां प्रसवतिया ॥५५॥**

**मराठी अर्थ** - पहा, लहान मुलांच्या तृप्तीने आपण तृप्त व्हावे किंवा शिष्याच्या पूर्ण होण्याने आपण कृतार्थ व्हावे, हे एक जन्मदात्री आई किंवा सद्गुरूच समजतात.

**गुह्यार्थ** - परमात्मा सांगतात की, शिष्याच्या अभ्यासाच्या पूर्णत्वाने जसे सद्‌गुरू तृप्त होतात हीच खरी गुरूंसाठी गुरुदक्षिणा तसेच शिष्य केव्हा पूर्णत्वाला जाईल? जेव्हा गुरु पूर्णत्वाला गेलेले असतील.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - ५९
**जें आतांचि सांगितलें होतें । अगा अधियज्ञ म्हणितला जयातें ।**
**जे आदींचि तया मातें । जाणोनि अंतीं ॥५९॥**

**मराठी अर्थ** - अर्जुना, ज्यास अधियज्ञ म्हणतात, म्हणून आताच सांगितले त्या मला जे पुरुष जिवंत असतानाच जाणून मरणकळाही जाणतात.

**गुह्यार्थ** - परमात्मा असे सांगतात की, तत्वमसिचा अभ्यास या देवोदुर्लभ मनुष्य जन्मात वृत्तीवर असताना निवृत्ती जाणून घ्यायची हीच खरी मुक्तीवरील भक्ती होय.

नानासाधने उधारीची हा ब्रम्ह साक्षात्काराचा रोकडा
आकाशमार्ग, गुप्तपंथ योगिये जाणती समर्थ,
इतरास हा गुह्यार्थ सहसा न कळे. **(दासबोध - १/९/५)**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - ६७
**तैसा आकारु हा आहाच भ्रंशे । वांचूनि वस्तु ते सांचलीचि असे ।**
**तेचि बुद्धि जालिया विसुकुसे । कैसेनि आतां ॥६७॥**

**मराठी अर्थ** - त्याप्रमाणे वरवर भासणारा जो शरीररूपी आकार तोच नाश पावत असून, त्या शरीराशिवाय असणारी आत्मवस्तु

जर जशी सर्वत्र भरलेली आहे तशीच आहे. तीच आत्मवस्तु आपण अनुभवाने झाल्यावर आता (देहपाताच्या वेळी) बुद्धीचा निश्चय कसा डगमगेल?

**गुह्यार्थ** - हा तत्वमसिचा अभ्यास देहाला सोडून आत्मस्थितीतील आहे, हे खरे वर्म सद्गुरू कृपेने समजेल, तर जीवस्थितीतील जे कर्म, योग, याग, श्वासावरील अभ्यास हे सर्व देहाकरवीच होतात आणि हाच सर्व मायेचा खेळ होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - ६९

**एऱ्हवीं तरी साधारण । उरीं आदळलिया मरण ।**
**जो आठवु धरी अंतःकरण । तेंचि होइजे ॥६९॥**

**मराठी अर्थ** - एऱ्हवीं साधारण विचार करून पाहिले तर मरण येऊन ठेपले असता मनुष्याच्या मनाला ज्या वस्तूची आठवण होते, तीच वस्तु तो प्राणी होतो.

**गुह्यार्थ** - मरण जवळ ठेपले असता, मनुष्याच्या जीवाला त्याने केलेल्या पाप - पुण्याचा चित्रपटच त्याच्या समोर येतो आणि शेवटच्या क्षणी ज्या वस्तूवर जीवाला स्थिर केले जाते त्या गतीला तो जातो. अभ्यासू व्यक्तीसाठी हा नियम लागू होत नाही; कारण त्यांच्याकडे जीव ही स्थितीच नसते. त्याचे पाप - पुण्य शिल्लकच नसल्यामुळे त्याला पुढील जन्मच नाही. अभ्यासू मनुष्य देह सोडल्यानंतर तो हिरण्यगर्भ अवस्थेत तो कायमस्वरूपी अभ्यासात राहतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - ८०

**हेंच कायिसया वरी होये । ऐसा जरी संदेहो वर्ततु आहे ।**
**तरी अभ्यासूनि आदीं पाहें । मग नव्हे तरी कोपें ॥८०॥**

**मराठी अर्थ** - अशी स्थिती कशाने होईल, असा जर संशय तुझ्या मनात राहिला असेल, तर अगोदर अभ्यास करून पहा, मग ती स्थिती झाली नाही, तर रागव.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, ही निवृत्ती अवस्थेतील स्थिती कशाने निर्माण होईल असा जर संशय मनुष्याला येत असेल तर ती स्थिती स्वत: अनुभवायची आहे. तीही सद्‌गुरू कृपेने तत्वमसिच्या अभ्यासाने त्या स्थितीला गेल्यावर हा संशय पूर्णपणे निघून जाईल.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - ८२

**तेविं सदभ्यासें निरंतर । चित्तासि परमपुरूषाची मोहर ।**
**लावी मग शरीर । असो अथवा जावो ॥८२॥**

**मराठी अर्थ** - त्याप्रमाणे चांगल्या अभ्यासाने तू निरंतर आपल्या चित्ताला परम पुरुषाचे ध्यान लाव. मग शरीर राहो अथवा जावो.

**गुह्यार्थ** - सद्‌गुरूंच्या कृपेने तत्वमसिच्या मिळालेल्या अभ्यासाने चित्तावर (श्वासावर) मोहर (शिक्का) लावणे म्हणजेच दहा

बोटांचा श्वास एक अंगुष्ठाण करणे. त्या स्थितीमध्ये त्याचा देह राहिला अथवा पडला.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - १००

**सकळां जाणणेयां जे लाणी । तिये जाणिवेची जे खाणी ।**
**तयां ज्ञानियांचिये आयणी । जयातें अक्षरु म्हणिपे ॥१००॥**

**मराठी अर्थ** - जे ज्ञान संपूर्ण ज्ञानाचा शेवट आहे, त्या ज्ञानाची जे केवळ खाणच आहेत त्या ब्रम्हज्ञान्यांच्या बुद्धीने ज्यास (ब्रम्हस्वरूपास) अविनाशी असे म्हणतात.

**गुह्यार्थ** - हा तत्त्वमसिचा अभ्यास (ज्ञान) हे सर्वश्रेष्ठ व अंतिम सत्य आहे, हेच खरे आध्यात्म होय. अशा अभ्यासू लोकांना 'अविनाशी' असे म्हणतात.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - ११४

**तैसें चित्त राहिलिया पांडवा । प्राणांचा प्रणवुचि करावा ।**
**मग अनुवृत्तिपंथें आणावा । मूर्ध्निवरी ॥११४॥**

**मराठी अर्थ** - अर्जुना, तसे चित्त स्थिर झाले असता मग प्राणवायुचा ॐकार करून (प्राणाने ॐकाराचे चिंतन केले असता प्राण प्रणवरूप होतो) त्यास मग सुषुम्ना नाडीच्या मार्गात मूर्ध्निआकाशापर्यंत आणावा.

**गुह्यार्थ** - या श्वासामधून म्हणजेच इडा - पिंगळा या दोन नाड्यांमधून बाजूला निघून सुषुम्ना या मार्गाने म्हणजेच

प्राणाचा प्रणव करून त्या सुषुम्ना मार्गाने ब्रम्हरंध्रापर्यंत पोहोचणे हाच तत्वमसिचा अभ्यास होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - ११८
**म्हणौनि प्रणवैकनाम । हें एकाक्षर ब्रह्म ।**
**जो माझें स्वरूप परम । स्मरतसांता ॥११८॥**

**मराठी अर्थ** - म्हणून प्रणव हे एक ज्याचे नाम आहे व जे एकाक्षर ब्रम्ह आहे, ते माझे मुख्य स्वरूप असून त्या स्वरूपाचे स्मरण करीत असावे.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, अभ्यास करीत असताना प्राणाचा प्रणव होतो, कुंडलिनी अधोची ऊर्ध्वमुख होते व तोच एकाक्षर ब्रम्ह, अनहत ध्वनि, एका हाताने वाजणारी टाळी व हेच परमेश्वराप्रत जाण्याची स्थिती होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - १२३
**तरि अगा ऐशिया ध्वनी । झणें थारा देशी हो मनीं ।**
**पैं नित्य सेविला मी निदानीं । सेवकु होयें ॥१२३॥**

**मराठी अर्थ** - तर, बाबा अशा शंकेला कदाचित तू मनात जागा देशील तर अशी शंका मनात आणू नकोस, कारण माझी जे नेहमीच सेवा करतात, त्या भक्तांच्या मरणकाळी मी त्यांचा सेवक होतो.

**गुह्यार्थ** - अभ्यासू मनुष्याची गात्रे (अवयव) शिथिल होत असताना देह सोडताना त्याचा अभ्यास हीच सेवा परमात्मा स्वत: उपस्थित राहून करतात व पुढच्या स्थितीत हिरण्यगर्भ अवस्थेची वाटचाल पूर्ण करतात.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - १५२
**एऱ्हवीं ब्रह्मपणाचिये भडसे । न चुकतीचि पुनरावृत्तीचे वळसे ।**
**परि निवटलियाचें जैसें । पोट न दुखे ॥१५२॥**

**मराठी अर्थ** - सहजच विचार करून पाहिले तर ब्रम्हपदाचा थोरपणा जरी प्राप्त झाला तरी त्यास पुन: पुन्हा येणारे जन्म - मरणाचे फेरे चुकतच नाहीत; परंतु ज्याप्रमाणे मेलेल्या माणसाचे पोट दुखत नाही.

**गुह्यार्थ** - काही लोक जीवस्थितीतून ब्रम्हावस्थेत जातात. उदाहरणार्थ - मानसिक संतुलन बिघडलेले लोक, काही योगी; पण ते अभ्यासाविना गेलेले, त्यास जन्म - मरणाचे फेरे चुकतच नाहीत; पण जे मनुष्य सद्गुरू कृपेने तत्वमसि अभ्यासायोगे परमात्म्या प्रत जातात. त्यांना पुन्हा जन्म - मरण नाही.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **आठवा**, ओवी - २३९
**कां जे मार्गामार्ग देखावे । साच लटिकें वोळखावें ।**
**हिताहित जाणावें । हिताचिलागीं ॥२३९॥**

**मराठी अर्थ** - कारण की, आपल्या हिताकरिताच योग्य - अयोग्य मार्ग पाहावे, खरे - खोटे ओळखावे आणि आपले हित कशात आहे व अनहित कशात आहे, हे समजून घ्यावे.

**गुह्यार्थ -** परमात्मा म्हणतात की, अनेक जन्मानंतर मिळालेला हा देवोदुर्लभ मनुष्य जन्म त्याचे परमात्म्याशी वचन काय आहे? त्याचे अंतिम ध्येय काय आहे? योग्य मार्ग कोणता आहे? आपले हित कशात आहे? हे ज्याचे त्याने सद्‌गुरू कृपेने समजून घेऊन या जन्माचे सार्थक करावे.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **आठवा**, ओवी - २४६

**तंव एकें बह्मत्वा जाइजे । आणि एकें पुनरावृत्ती येइजे ।**
**परि दैवगत्या जो लाहिजे । देहांतीं जेणें ॥२४६॥**

**मराठी अर्थ -** तर पहिल्या मार्गाने (आर्चिरादि मार्गाने) ब्रम्हत्वास जाता येते आणि दुसऱ्या (धूम्रमार्गाने) पुनर्जन्माला येणे होते. परंतु प्रारब्धाने मरणकाळी ज्याला जो मार्ग वाट्याला येईल, त्याला त्या मार्गाची गती प्राप्त होते.

**गुह्यार्थ -** जी जीवस्थितीत श्वासायोगे (मायेमध्ये) जो व्यवहार योग, याग, कर्मकांड करतात त्याच्या फळानुसार मरणकाळी त्याच्या योग्यतेनुसार त्याला पुढची गती प्राप्त होते; परंतु अभ्यासू मनुष्याचे जीवस्थितीतील व आत्मस्थितीतील सर्व व्यवहार व अभ्यास हा परमात्माच करवून घेतो व तसेच अंतिम समयी म्हणजेच देह सोडणे हे त्या अभ्यासूक मनुष्याच्या इच्छेवर अवलंबून असते. योग्य वेळी तो मनुष्य देह सोडून हिरण्यगर्भ अवस्थेत जातो.

एका जनार्दनी भोग प्रारब्धाचे, हरीकृपे त्याचा नाश केला.

# अध्याय - नववा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - ७

**तेवी तुम्हा संतांचा पढियावो । कैसेनि तरि आम्हांवरी हो ।
या बहुवा आळुकिया जी आहों । सलगी करीत ॥७॥**

**मराठी अर्थ** - याप्रमाणे तुम्हा संतांचे प्रेम कशाने तरी आमच्यावर व्हावे, अशी आमची फार इच्छा असल्यामुळे महाराज, आम्ही सलगी करीत आहोत.

**गुह्यार्थ** - ज्ञानेश्वर माऊली म्हणतात, तुम्ही एकवेळ फक्त माझ्या बोलण्याकडे लक्ष द्या आणि हा परमात्मा प्राप्तीचा मार्ग अवलंबावा, म्हणजे सर्व नित्य सुखाशी प्राप्त व्हाल. असा हा तत्वमसि अभ्यास सद्‌गुरु कृपेने घ्यावा. हा मार्ग परमात्म्याचा, संतांनी अवलंबीला तो तुम्हीसुद्धा अवलंबावा, आणि याचमुळे संतांचे प्रेम तुमच्यावर होईल.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - ३७

**म्हणौनि गूढपण आपुलें मोडो । वरि न बोलावेंही बोलावें घडो।
परि आमुचिये जीवींचें पडो । तुझां जीवीं ॥३७॥**

**मराठी अर्थ** - म्हणून आमचे गुप्तपण मोडले तर मोडो! शिवाय न बोलण्याची इच्छा अशी जो गोष्ट तीही बोलली जावो! पण आमच्या अंतःकरणातील गुप्त गोष्ट तुझ्या मनात उतरो.

**गुह्यार्थ** - परमात्मा जीवाला असा उपदेश करतात, हा देवोदुर्लभ मनुष्य जन्म तुम्हाला लाभला आहे आणि माझे तुमच्यावर विशेष प्रेम आहे, म्हणून मजप्रत पोहोचण्याचे गुह्य वर्म सद्गुरूंनी उलघडले आहे. म्हणजेच तत्वमसि महावाक्याचा बोधाचा अभ्यास, हा एकमेव मार्ग तुला मिळावा ही माझी तीव्र इच्छा आहे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - ४०

**यालागीं सुमनु आणि शुद्धमती । जो अनिंदकु अनन्यगती ।**
**पैं गा गौप्यही परि तयाप्रती । चावळिजें सुखें ॥४०॥**

**मराठी अर्थ** - याकरिता चांगल्या मनाचा व शुद्धबुद्धीचा आणि निंदा न करणारा व एकनिष्ठ असा श्रोता जर मिळाला, तर त्यास आपली गोष्ट गुह्य असली तरी खुशाल सांगावी.

**गुह्यार्थ** - हे अभ्यासाचे गुह्यज्ञान ज्या साधकास असते, त्याने या मार्गाची माहिती दुसऱ्यांना सांगावी परंतु निंदानालस्ती करणारा व त्यांची महती पटवून न घेणाऱ्यास जबरदस्तीने न सांगावे पण सद्गुरु हे माऊली प्रमाणे असतात, त्यांच्याकडे येणाऱ्याची मनुष्य हीच ज्याची पात्रता आहे, त्यांना हे गुह्य सद्गुरु नक्कीच सांगतात.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - १२४

**आणि सुटलिया सिंधुजळाचा लोटु । न शके धरुं सैंधवाचा घाटु।**
**तेवि सकळ कर्मा मीच शेवटु । ती काइ बांधती मातें ॥१२४॥**

**मराठी अर्थ** - आणि समुद्राच्या पाण्याचा लोट सुटला असता त्यास मिठाचा घाट थोपवून धरू शकत नाही. (कारण मीठाचा अंत समुद्राच्या पाण्यात होतो.) त्याप्रमाणे सर्व कर्माची समाप्ती जर माझ्या स्वरूपी होते, तर ती कर्म मला काय बांधणार?

**गुह्यार्थ** - परमात्मा मार्गदर्शन करताना असे म्हणतात, जेव्हा मनुष्य सद्‌गुरु कृपेने मजप्रत येण्याच्या मार्गाचा अवलंब करतात, ज्या मार्गाचा संतांनी स्वीकार केला, त्याचवेळी तो जीवस्थितीतून आत्मस्थितीत येतात. त्याचवेळी सर्व कर्माची समाप्ती होते आणि हे सर्व निष्काम कर्मयोगाद्वारे होते.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - १३१

**जे लोकचेष्टां समस्तां । जैसा निमित्तमात्र कां सविता ।**
**तैसा जगत्प्रभवीं पंडुसुता । हेतु मी जाणें ॥१३१॥**

**मराठी अर्थ** - लोकांच्या सर्व व्यापाराला सूर्य जसा निमित्तमात्र आहे, त्याप्रमाणे अर्जुना, जगाच्या उत्पत्तीला मी हेतु आहे असे समज.

**गुह्यार्थ** - परमात्मा असे सांगतात, सूर्य जसा पृथ्वीवरील व्यवहारास निमित्तमात्र आहे, तसा मी या जगाच्या उत्पत्तीला हेतुमात्र आहे. मी स्वतः काही करीत नाही, एऱ्हवीं प्रकृतीच्या नियमानुसार व्यवहार चालतात, तसेच सर्व प्राणीमात्रांमध्ये 'मी' आहे, पण प्राणीमात्र माझ्यात नाहीत. म्हणून हे सर्व तुला जाणून

घ्यायचे असेल तर सद्‌गुरु कृपेने महावाक्याच्या बोधाने समजून येईल.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - १३५

**हें सर्वस्व आमुचें गूढ । परि दाविलें तुज उघड ।**
**आतां इंद्रियां देऊनि कवाड । हृदयीं भोगीं ॥१३५॥**

**मराठी अर्थ** - ही आमची सर्वस्वी लपवून ठेवलेली गोष्ट आहे, परंतु तुला उघड करून सांगितली आहे. आता इंद्रियांची द्वारे बंद करून (सर्व इंद्रियवृत्ति अंतर्मुख करून) तू या गुह्य विचारांचा अंतःकरणात अनुभव घे.

**गुह्यार्थ** - परमात्मा अभ्यासाचे गुह्य प्रगट करताना असे म्हणतात, हे मनुष्या तू माझा अतिशय प्रिय आहेस म्हणून ही अती गुढ अभ्यासाची महती तुला सद्‌गुरु कृपेने व महावाक्याच्या बोधाने मी सांगत आहे म्हणजेच जीवस्तीतीवरून आत्मस्थितीत येऊन सच्चिदानंद अवस्थेचा अनुभव घे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - १३९

**तैसें बोलवरि वाचाबळें । वायांचि झकविजती प्रतीतीचे डोळे ।**
**मग साचोकारें बोधावेळे । आथि ना होईजे ॥१३९॥**

**मराठी अर्थ** - त्याप्रमाणे वक्तृत्वाच्या जोरावर कित्येक आपल्या प्रतिपादनाने (स्वतःच्या) अनुभवाचे डोळे उगीच झाकण्यास

लावतात. (आपण आपल्याला फसवितात); मग खऱ्या बोधाची वेळ (बोधाच्या परिक्षेची वेळ) आली म्हणजे बोध असतही नाही व होतही नाही.

**गुह्यार्थ -** जीवस्थितीतील मायेला धरून बुद्धिवादी लोक योग, याग, कीर्तन, प्रवचन हे जे संतसाहित्यावर करून स्वतःचे कौतुक करतात, तेव्हा ते अज्ञानाने स्वतःला स्वतः फसवतात आणि ह्याच अज्ञानाने मायेच्या आधिनतेने त्यांना खरा बोध होत नाही, म्हणून त्यांचे जन्माला येणेचं फुकट, म्हणून अर्जुना, पृथ्वीवर दगड काही कमी आहेत काय?

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **नववा**, ओवी - २०८

**परि तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिंवसावा ।**
**जेथ नामघोषु बरवा । करिती ते माझे ॥२०८॥**

**मराठी अर्थ -** परंतु अशा रीतीने मी जरी हरवलो असलो, तरी पण माझे भक्त जेथे माझा नामघोष चांगला करतात, त्याजपाशी अर्जुना, मला शोधावा (मी तेथे सापडावयाचाच).

**गुह्यार्थ -** भक्त व भक्तीचा महिमा अभ्यासाद्वारे सांगतात, जर तुम्हा लोकांना मला शोधावयाचे असेल तर अशा भक्तापाशी शोधा जो मुक्तीवरील भक्ती जाणतो व ज्याचे अखंड ध्यान परमात्म्यापर्यंत असते. त्याच्या भजनाच्या छंदात माझा प्रवेश असतो, भजन ते भजन म्हणजेच तत्वमसि महावाक्याचा बोध होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - २४३
**तो प्रतीतीचेनि पात्रें । विवेकमहामंत्रें ।**
**ज्ञानाग्निहोत्रें । भेदु नाशी ॥२४३॥**

**मराठी अर्थ** - तो यज्ञ करणारा जीव, स्वरूपानुभवरूप पात्राने ब्रम्हविचार रूप महामंत्राने व ज्ञानरूप अग्निहोत्रकर्माने, जीव व ईश्वर यांच्या भिन्नपणाची आहुति देऊन, तो भेद नाहीसा करतो.

**गुह्यार्थ** - परमात्मा असे म्हणतात, अभ्यासाचे गुप्त ज्ञान तुम्ही सद्‌गुरु कृपेने जाणून जीव व ईश्वर म्हणजेच माया याची आहुती दिल्यानंतर तो द्वैतभाव नाहीसा होतो व ते अद्वैत ज्ञान तुम्हास कळले की, त्या परमात्म्याच्या स्थितीप्रत (आत्मा) तुम्ही जाऊ शकता.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - ३१४
**एऱ्हवीं तरी नरकींचें दुःख । पावोनि स्वर्गा नाम कीं सुख ।**
**वांचूनि नित्यानंद गा निर्दोष । तें स्वरुप माझें ॥३१४॥**

**मराठी अर्थ** - एऱ्हवीं नरकाच्या दुःखाकडे दृष्टी देऊन स्वर्गाला सुख हे नाव आले आहे. वास्तविक पाहिले असता अर्जुना, निर्दोष असा जो त्रिकालाबाधित आनंद ते माझे स्वरूप आहे.

**गुह्यार्थ** - जीवस्थितीत जर आपण पुण्य केले तर सुख आहे आणि पाप केले तर दुःख होईल, परमात्मा म्हणतात, तुम्हाला त्रिकालाबाधित आनंद घ्यावयाचा असेल तर सद्‌गुरु कृपेने

ब्रम्हबोध महावाक्याचा अभ्यासाने तुम्ही माझी सहजस्वरूप स्थिती जाणाल तरी तीच माझी खरी भक्ती होय व त्याचाच आनंद घ्या.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - ३३४

**म्हणौनि मज एकेंविण । हे त्रयीधर्म अकारण ।**
**आतां मातें जाणोनि कांहीं नेण । तूं सुखिया होसी ॥३३४॥**

**मराठी अर्थ** - म्हणून एका मला टाकून केलेले, तीनहि वेदांनी सांगितलेले, धर्म (ज्योतिष्टोमादिक यज्ञकर्म) निरर्थक आहेत. यास्तव अर्जुना, मला एक जाणलेस, मग जरी दुसरे काही जाणले नाहीस, तरी तू सुखी होशील.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, माझी ओळख करून घेणे हा खरा मनुष्याचा स्वधर्म. हा तू सद्गुरूंकडून समजून घेणे. याव्यतिरिक्त वेदांनी सांगितलेला धर्म, बुद्धिवाटे केलेले सर्व योग, याग निरर्थक आहेत.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - ३४५

**तेंही कीर मातेंचि होये । कां जे हें आघवें मीचि आहें ।**
**परि ते भजती उजरी नव्हे । विषम पडे ॥३४५॥**

**मराठी अर्थ** - ते त्यांनी इंद्रादिकांच्या भावनेने केलेले भजन वास्तविक माझेच (भजन) होत असते कारण की, या सर्व रुपांनी

मीच एक आहे, पण तो त्यांचा भजन करण्याचा संप्रदाय सरळ नसून वाकडा (चुकीचा) आहे.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, हे बुद्धिजीवी लोक या मायेमध्ये क्रिया, कर्म, योग, याग, तप करतात तो मार्ग सरळ नसून चुकीचा आहे. म्हणजेच रजोगुण आणि तमोगुण किंवा ईडा आणि पिंगळा असे म्हणता येईल, याउलट परमात्माप्रत जाणेचा अंतिम मार्ग सद्‌गुरु कृपेने तत्वमसि महावाक्याचा बोध होणे म्हणजेच सुषुम्नेचा मार्ग हा योग्य मार्ग होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - ३६४

**जयांचीं जाणती मजचि शास्त्रें । मी जोडें जयाचेनि मंत्रें ।**
**ऐसे जे चेष्टामात्रें । भजले मज ॥३६४॥**

**मराठी अर्थ** - ज्यांची शास्त्रे तर मलाच जाणतात जे अशा मंत्रांचा जप करतात की, त्यापासून त्यांना माझीच प्राप्ती होते, अशा प्रकारे ज्यांनी आपल्या कायिक, वाचिक मानसिक या सर्व कर्मांनी माझे भजन केले, त्यांना मरण येण्याच्या पूर्वीच त्यांचे माझ्या स्वरूपाशी निश्चयेकरून ऐक्य झालेले असते. ते मग मरण समयी इतर गतीस कसे जातील?

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात, ज्याने माझे ज्ञान करून देणाऱ्या ज्ञानाचा अभ्यास केला आहे, म्हणजेच सद्‌गुरु कृपेने तत्वमसि बोधाचा अभ्यास घेतला आहे, असे अभ्यासू जे अभ्यासालाच सर्वस्व मानतात व त्यातच रमतात, अभ्यासानेच ते मला भजतात, अशा अभ्यासू व्यक्ती नक्कीच माझ्या स्वस्वरूपापर्यंत

येतात, त्यास पुन्हा जन्म - मरण नाही, तो हिरण्यगर्भ अवस्थेत अभ्यास करत राहतो. याउलट इतर लोक पुन्हा - पुन्हा जन्म - मरण भोगतात व या मायेच्या रहाट गाडग्यातच गुरफटून जातात.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - ४७४

**यापरि पापयोनीही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना ।**
**मातें भजतां सदना । माझिया येती ॥४७४॥**

**ज्ञानेश्वरी**

अध्याय - **नववा**, ओवी - ४७५

**मग वर्णांमाजीं छत्रचामर । स्वर्ग जयांचें अग्रहार ।**
**मंत्रविद्येसि माहेर । ब्राह्मण जे ॥४७५॥**

**मराठी अर्थ** - याप्रमाणे अर्जुना, पापी जातीत जन्म झालेले किंवा वैश्य, शूद्र अथवा स्त्रिया यांनी माझे भजन केले असता, ती माझ्या स्वरूपाला येऊन मिळतात. (४७४) मग चारही वर्णांमध्ये छत्रचामराप्रमाणे सर्वांच्यावर असलेले, ज्यांना स्वर्ग हा निर्वाहाकरिता इनाम दिलेला आहे व जे वेदातील मंत्ररूप विद्येचे माहेरघर आहेत, असे जे ब्राम्हण, जेथे (ज्या ब्राम्हणांच्या ठिकाणी) नेहमी यज्ञाचे राहणे असते. (४७५)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक ४७४ आणि ४७५ मिळून) परमात्मा अभ्यासाची महती सांगताना असे म्हणतात की, अभ्यास घेण्यासाठी मनुष्य हीच पात्रता (जी देवोदुर्लभ आहे) यापुढे पापी, वैश्य, क्षुद्र, स्त्री, पुरुष हा भेद गरजेचा नाही, कारण अभ्यास हा जीवासाठी आहे; देहासाठी नव्हे. अशा मनुष्याने जर

परमात्म्याचे ज्ञान सद्‌गुरु कृपेने जाणले तर ते म्हणजे ज्याने ब्रम्ह जाणले तोच ब्राम्हण, तोच द्विज होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **नववा**, ओवी - ५३०

**ऐसा महासुखाचेनि आर्तिरसे । जेथ आटणी होईल जीवदशे ।**
**तेथे निरोविलें व्यासें । तें नेदीच हों ॥५३०॥**

**मराठी अर्थ** - याप्रमाणे महासुखाच्या भराने जेव्हा जीवदशेची आटणी होण्याची वेळ आली, तेव्हा व्यासांनी युद्धवृत्तांत सांगण्याची केलेली आज्ञा ती आटणी होऊ देईना.

**गुह्यार्थ** - अभ्यासाची महती सांगताना परमात्मा म्हणतात की, नाकावाटे वाहणारा बारा बोटाचा श्वास हा एक अंगुष्ठाण होणे, म्हणजेच आटणी होय आणि त्यालाच देवत्व प्राप्त होणे असे म्हणता येईल. ही अभ्यासाची अंतिम स्थिती होय. या स्थितीमध्ये नियतीच्या नियमामध्ये व श्वासाला कसलाही धक्का न लावता होणारा अभ्यास होय.

# अध्याय - दहावा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - दहावा, ओवी - १३
**तैसें श्रीगुरूचें महिमान। आकळितें कें असे साधन।**
**हें जाणोनि मियां नमन। निवांत केलें ॥१३॥**

**मराठी अर्थ** - त्याप्रमाणे श्रीगुरूंच्या मोठेपणाचे आकलन करणारे साधन कोठे आहे? (कोठेही नाही.) हे लक्षात घेऊन मी निमूटपणे त्यांना नमस्कार केला.

**गुह्यार्थ** - दहाव्या अध्यायाच्या सुरवातीस परमात्मा सद्‌गुरूंची महती सांगताना असे म्हणतात की, सद्‌गुरूंची महिमा वर्णन करण्यास बुद्धी व शब्द अपुरे पडतील, तेव्हा सद्‌गुरु हे कसे असावेत कि जे ज्ञानी महावाक्याच्या बोधाचा तत्वमसि अभ्यास, जो परमात्माप्रत पोहचवण्याचा अभ्यास शिष्यास देतात व जे स्वत: पुर्नत्वाला गेलेले असतात, असे जे सद्‌गुरु त्यासंदर्भात संतांची काही पदे आहेत.

(१) स्वामी म्हणे झाले कृतार्थ जीवनं, सद्‌गुरु चरण उपासिता - स्वामी स्वरूपानंद
(२) सद्‌गुरु वाचोनि सापडेना सोयं, धरावे ते पाय आधी आधी, तात्काळ करिती आपल्या सारखे, तया काळ - वेळ नाही. संत तुकाराम महाराज.
(३) सद्‌गुरु असावा ज्ञानी, चिन्मय रत्नांची खाणी, वस्तू जुन्यातली ती जुनी, दाखवी या नयनी - ज्ञानेश्वर माऊली.
(४) ब्रम्हरंद्री तो निमाला, अहं ब्रम्हा कैसे झाला, तुका म्हणे सांगावी खूण, तरच सद्‌गुरु म्हणेन.

यावरून असे म्हणता येईल की सद्गुरु परमात्म्यापर्यंत पोहोचण्याची खूण दाखवतील व जे स्वतः पूर्णत्वास गेलेले आहेत अशा सद्गुरूंना आपण अभ्यासाने नमन करावे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **दहावा**, ओवी - २१

**होती देहबुद्धी एकसरी । ते आनंदभांडारा केली वोवरी ।**
**मन गीतार्थसागरीं । जळशयन जालें ॥२१॥**

**मराठी अर्थ** - माझ्या बुद्धीने जे देहाशी एकसारखे तादात्म्य केले होते, त्या माझ्या बुद्धीला (देहतादात्म्यापासून सोडवून) आनंदरूपी खजिन्याची खोली केली आणि माझे मन गीतेच्या अर्थरूपी क्षीरसमुद्रात महाविष्णु झाले.

**गुह्यार्थ** - परमात्मा मार्गदर्शन करता - करता असे सांगतात की, जो ईश्वर बुद्धिवाटे त्या जीवाचे संचितकर्म फेडून घेतो, तो जीव ते कार्य देहाकडून करवून घेतो व यालाच जीवस्थिती म्हणतात. अभ्यासाने आपण ज्या स्थितीला जातो ती आत्मस्थिती व या दोन स्थिती (जीवस्थिती व आत्मस्थिती) म्हणजेच परमात्मा हा प्रतिबिंबित होतो त्यावेळी या स्थिती निर्माण होतात. अतिमहान व अतिशुद्ध हा परमात्मा यापासून वेगळा आहे, हे सर्व एका ज्ञानापासून समजू शकते ते म्हणजेच आत्मज्ञान, ते केवळ सद्गुरु कृपेने व महावाक्याच्या बोधानेच होऊ शकते.

**एक ज्ञानाचे लक्षणं, ज्ञान म्हणजे आत्मज्ञान,**
**पहावे आपणासी आपण या नाव ज्ञान ।**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **दहावा**, ओवी - ५७
**तैसें एथ पार्था । तुज आभार नाहीं सर्वथा ।**
**आम्ही आपुलियाचि स्वार्था । बोलौनि आम्ही ॥५७॥**

**मराठी अर्थ** - अर्जुना, त्याप्रमाणे येथेही आहे, या सांगण्यात तुझ्यावर मुळीच उपकाराचे ओझे नाही, कारण आम्ही आपल्या स्वार्थासाठी बोलत आहोत.

**गुह्यार्थ** - परमात्मा मनुष्य जन्माचे महत्व सांगताना म्हणतात की, हा देवोदुर्लभ मनुष्य जन्म मिळाला आहे आणि हा माझा अतिशय प्रिय असा आहे म्हणून मी माझा स्वार्थ समजतो की, या मनुष्याला हे गुह्य ज्ञान समजावे. तेव्हा तुम्ही माझे उपकार न मानता, हा माझा स्वार्थ आहे असे समजावे आणि तत्वमसि महावाक्याचा बोध तुम्ही सद्गुरु कृपेने समजून घेतले व मजप्रत येण्याचा प्रयत्न केला तर माझा आनंद व्दिगुणीत होईल.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **दहावा**, ओवी - ६९
**उतरलें उदक पर्वत वळघे । का वाढतें झाड मुळीं लागे ।**
**तरी मियां जालेनि जगें । जाणिजे मी ॥६९॥**

**मराठी अर्थ** - पर्वतावरून खाली आलेले पाणी जर पुन्हा पर्वतावर चढेल अथवा वाढणारे झाड शेंड्याकडून मुळाकडे येईल, तर माझ्यापासून झालेल्या जगाकडून मी जाणला जाईन,

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, मोठाले ऋषी आणि देव यांना आणि दुसरे जेवढे म्हणून प्राणी आहेत त्या सर्वांना मीच कारण आहे, म्हणून मला जाणने त्यांना कठीण आहे, मी फक्त या

लोकांनाच जाणला जाईल जे सद्गुरु कृपेने महावाक्याच्या बोधाने अभ्यास करतात व मातेच्या गर्भात असलेली आत्मस्थिती ही अवस्था अभ्यासाद्वारे मिळवतात, आत्म्याचा प्रवेश मातेच्या गर्भात असताना 'ब्रम्हरंद्रातून' होऊन तो जीवस्थितीमध्ये मनुष्याच्या 'नाभीस्थानी' येतो, म्हणून नाभीस्थानापासून पुन्हा ब्रम्हरंद्राचा प्रवास म्हणजेच प्राणाचा प्रणव करणे, म्हणजे प्राण अधोमुख आहे तो उर्ध्वमुख करून सुषुम्नेच्या मार्गाने ब्रम्हरंद्र उघडणे म्हणजेच मूळ स्थितीत जाणे हेच त्या परमात्म्याला दिलेले वचन, जो अभ्यासाद्वारे जाणतो तोच मला ओळखेल.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **दहावा**, ओवी - ७७
**तो चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ ।**
**परि माणुसपणाची भांब । लोकाचि भागु ॥७७॥**

**मराठी अर्थ -** तो ज्ञानाची चालती मूर्ती आहे, त्याचे अवयव ते सुखाला फुटलेले अंकुर आहेत, परंतु (त्याच्या ठिकाणी दिसणारा) माणुसपणा हा लोकांच्या दृष्टीला होणारा भ्रम आहे.

**गुह्यार्थ -** सद्गुरु म्हणजेच ज्ञानाची चालती मूर्ती आहे, त्यांच्या ठिकाणी दिसणारा मनुष्यपणा हा लोकांच्या दृष्टीने होणारा भ्रम आहे. सद्गुरु निराकार आहेत.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **दहावा**, ओवी - १०९
**कां जे ऐसें किरीटी । मातें भजे जो अभेदा दिठी ।**
**तयाचिये भजनाचिये नाटीं । सूती मज ॥१०९॥**

**मराठी अर्थ** - कारण की अर्जुना, अशा अभेद दृष्टीने जो मला भजतो, त्याच्या भजनाच्या छंदात माझा प्रवेश आहे.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात, अद्वैत स्थितीत सद्‌गुरु कृपेने तत्वमसि महावाक्याच्या बोधाने अभ्यासू व्यक्ती मला भजतात, त्यांच्या भजनाच्या छंदात म्हणजेच त्यांच्या अभ्यासामध्ये माझा प्रवेश असतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **दहावा**, ओवी - ११८
**जें जें भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।**
**हा भक्तीयोगु निश्चित । जाण माझा ।।११८।।**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **दहावा**, ओवी - ११९
**चित्तें मीचि जाहाले । मियांचि प्राणें धाले ।**
**जीवों मरों विसरले । बोधाचिया भुली ॥११९॥**

**मराठी अर्थ** - जो जो प्राणी दिसेल, तो तो प्रत्यक्ष परमात्मा आहे असे समजावे, हा माझा भक्तियोग आहे, असे निश्चित समज. (११८) अंतःकरणाने ते माझेच स्वरूप बनून त्यांचे प्राण माझ्याच स्वरूपानुभवाने तृप्त झालेले असतात व अशा स्थितीत बोधाच्या भुलीमुळे जन्म - मरणाला विसरतात. (११९)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक ११८ आणि ११९ मिळून) परमात्मा म्हणतात, प्रत्येक प्राणीमात्र माझी आत्मस्थितीच आहे, हे तुम्ही जाणून घ्या व ही आत्मस्थिती केवळ देवोदुर्लभ मनुष्य प्राणी सद्‌गुरु कृपेने जाणू शकतो, जो ती या जीवस्थितीमध्ये

(मायेमध्ये) आडकल्याने विसरला आहे, ती मुळची स्थिती, परमात्म्याचे वचन हे ते अभ्यासानेच अज्ञान दूर करून सद्‌गुरु कृपेने जाणू शकतात.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **दहावा**, ओवी - १४६

**जी जन्मलेपण आपुलें । हें आजि मियां डोळां देखिलें ।**
**जीवित हातां चढलें । आवडतसें ॥१४६॥**

**मराठी अर्थ** - महाराज, मी आपला जन्म हा आज डोळयांनी पाहिला (आत्मज्ञान होणे हा नवा जन्म आहे व तो माझा आज झाला) त्यामुळे माझे जीवित माझ्या हाती आले, असे मला वाटते.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात, सद्‌गुरु कृपेने मला जाणण्याचा जो तत्वमसि महावाक्याचा बोध घेतलेला मनुष्य ज्यावेळी जीवस्थितीतून आत्मस्थितीत जातात त्यावेळी तो त्यांचा पुनर्जन्म होय व हे आत्मज्ञान ज्यांनी जाणले तेच द्विज म्हणजेच ब्रम्ह जाणलेले ब्राम्हण होत आणि केवळ हेच लोक स्वतःचे वर्तमान आणि भविष्य बदलण्याचे अधिकारी आहेत.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **दहावा**, ओवी - १७९

**तैसें हें तुझें जाणणें आहे । म्हणौनि कोणाही ठावकें नोहे ।**
**आतां तुझें ज्ञान होये । तुजचिजोगें ॥१७९॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **दहावा**, ओवी - १८०

**जी आपणपयातें तूंचि जाणसी ।**
**आणिकातें सांगावयाही तूं समर्थ होसी ।**

**तरी आतां एक वेळ घाम पुसीं ।**
**आर्तीचिये निडळींचा ॥१८०॥**

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **दहावा**, ओवी - ३३४
**जो प्रल्हादाचिया बोला । विषाहीसकट आपणचि जाहला।**
**तो सद्‌गुरु असे जोडला । किरीटीसी ॥३३४॥**

**मराठी अर्थ -** त्याप्रमाणे तुझे ज्ञान करूण घेण्याचिहि गोष्ट असंभवनीय आहे आणि म्हणूनच तुझे ज्ञान कोणालाहि होत नाही, एवढ्याकरिता तुझ्या स्वरूपाचे ज्ञान करून घेण्याचे काम तुलाच फक्त शक्य आहे. (१७९) अरे देवा, तू आपल्या स्वरूपाला तूच जाणतोस आणि ते ज्ञान दुसऱ्यास सांगण्यास देखील तूच समर्थ आहेस. तर आता एक वेळ माझ्ा इच्छारुपी कपाळावरचा घाम पुसून टाक. (१८०) प्रल्हादाने (माझा नारायण सर्व पदार्थात व्याप्त आहे असे हिरण्यकश्यपूस), सांगितल्या कारणाने जो विषाहि सकट सर्व पदार्थ आपण झाला, असा जो श्रीकृष्ण परमात्मा तो अर्जुनाला सद्‌गुरु लाभला होता. (३३४)

**गुह्यार्थ -** (ओवी - १७९, १८० आणि ३३४ मिळून) परमात्मा मार्गदर्शन करताना वरील तिन्ही ओव्यांमध्ये म्हणतात की, हे आत्मज्ञान सांगण्यास केवळ मी अतिशुद्ध असा एकच परमात्माच समर्थ आहे आणि या जीवाला उपदेश करणारा हा मी निराकार सद्‌गुरु होय.

# अध्याय - अकरावा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **अकरावा**, ओवी - २६

**बाप बाप ग्रंथ गीता । जो वेदीं प्रतिपाद्य देवता ।**
**तो श्रीकृष्ण वक्ता । जिये ग्रंथीं ॥२६॥**

**मराठी अर्थ** - धन्य धन्य गीताग्रंथ की, ज्या गीताग्रंथाचा वक्ता वेदांच्या प्रतिपादनाचा विषय जो कृष्ण परमात्मा, तो आहे.

**गुह्यार्थ** - ग्रंथामध्ये श्रेष्ठ असा गीताग्रंथ होय, का, तर याच्यामध्ये शुद्ध असा आत्मज्ञानाचा उपदेश खुद्द परमात्म्याने केला आहे तर परमात्मा निराकार असल्याने त्यांनी व्दैतामध्ये हे अद्वैत ज्ञान ब्रम्हस्थितीतून महर्षी व्यास व माऊली ज्ञानेश्वर महाराज यांच्या करवे मांडले. हे जनमाणसांनी समजून घ्यावे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **अकरावा**, ओवी - ४५

**जैं महाभूतें ब्रह्मीं आटती । जीव महदादींचे ठाय फिटती ।**
**तैं जें देव होऊनि ठाकती । तें विसवणें शेषींचें ॥४५॥**

**मराठी अर्थ** - ज्यावेळी पंचमहाभूत ब्रम्हामध्ये नाहीशी होतात व जीव आणि महत्त्व वगैरे यांचा पत्ता नाहीसा होतो, त्या वेळी देवा, आपण जे (ब्रम्हरूप) होऊन राहता ते शेवटचे विश्रांतीस्थान आहे.

**गुह्यार्थ** - अभ्यासाचे महत्व सांगताना परमात्मा म्हणतात की, तत्वमसिच्या अभ्यासाद्वारे मनुष्य ज्यावेळी आत्मस्थितीत

पंचमहाभूतांनी पंचमहाभूतांची आटणी केल्यानंतर परमात्म्याच्या ओळखीचे जे चिन्ह होते तेव्हा परमात्मा कळतो. त्या अवस्थेत नेहमी राहावे, हेच खरे मनुष्य जन्माचे ध्येय व विश्रांतिस्थान होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **अकरावा**, ओवी - ७६

**तैसी प्रकृती हे आड होती । ते देवेंचि सारिली परौती ।**
**मग परतत्त्व माझिये मती । शेजार केलें ॥७६॥**

**मराठी अर्थ** - त्याप्रमाणे माझ्या स्वरूपाच्या आड अज्ञान होते, ते देवांनीच दूर सारले, नंतर माझ्या बुद्धीला आपणच परब्रम्हाचे शेजघर केले. (ब्रम्हस्वरूपी माझी बुद्धी स्थिर केली).

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात, अभ्यासाद्वारे जीवस्थितीत बुद्धीचा संबंध तोडून अभ्यासू व्यक्ती आत्मस्थितीत जाते. त्यालाच त्यांनी ब्रम्हस्वरूपी बुद्धी स्थिर केली असे रूपक दिले आहे. बुद्धी स्थिर म्हणजे बुद्धीचा / मायेचा संबंध तोडून व आत्मस्थितीत परमात्मा प्राप्तीच्या अवस्थेत राहणे म्हणजेच हिरण्यगर्भ अवस्था. या अवस्थेत जे स्फुरते ते परमात्म्याद्वारे व याच प्रकारे निराकार परमात्म्याने द्वैतामध्ये मांडलेले हे अद्वैत ज्ञान माऊलींच्या माध्यमातून स्फुरले असे म्हणता येईल.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **अकरावा**, ओवी - २७६

**तंव देखिलें जी आघवेंचि । तरि आतां तुज देवा ठावो तूंचि ।**
**तूं कवणाचा नव्हेसि ऐसाचि । अनादि आयता ॥२७६॥**

**मराठी अर्थ -** तेव्हा महाराज, हे मी सर्वच विचार करून पाहिले, तर देवा, आता तुझे ठिकाण तूच आहेस. तू कोणाचा नाहीस, तर तू अनादि व स्वतः सिद्ध असाच आहेस.

**गुह्यार्थ -** परमात्म्या तुझे ठिकाण तूच आहेस, तू कोणाचा नाहीस, तू कशातही येत नाहीस, तरीही हे सर्व तुझ्या सत्तेने चालले आहे. तू अनादी व स्वयंसिद्ध आहेस.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **अकरावा**, ओवी - ४०२
**म्हणौनि भोग्य तें त्रिशुद्धी न चुके ।**
**आणि बुद्धिही होणारासारिखी ठाके ।**
**माझां कपाळीं पिटावें लोकें । तें लोटेल कांह्यां ॥ ४०२ ॥**

**मराठी अर्थ -** म्हणून जे भोगावयाचे आहे, ते कधीही चुकणार नाही आणि जसे होणार असेल, त्यासारखी बुद्धी होते. माझ्या प्रारब्धात लोकांनी मला दोष द्यावा असे असेल, ते कसे चुकेल?

**गुह्यार्थ -** परमात्मा म्हणतात, तुमच्या मागील संचित प्रारब्धानुसार पुढील जन्मामध्ये तुम्हास जे भोग भोगावे लागतात, पण हे वर्तमान व भविष्य बदलण्याचा अधिकार फक्त या मनुष्याने सद्‌गुरु कृपेने ब्रम्हवाक्याचा महाबोध म्हणजेच आत्मज्ञान जाणले आहे व ज्यास परमात्मा प्राप्त झाला आहे, ते करू शकतात. याचा दाखला देताना संत एकनाथ महाराज म्हणतात -

**एका जनार्दनी भोग प्रारब्धाचे ।**
**हरिकृपे त्याचा । नाश केला ।**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **अकरावा**, ओवी - ५१३

**जी तूं त्रिजगतिये वोलावा । अक्षर तूं सदाशिवा ।**
**तूंचि संतासंत देवा । तयाही अतीत तें तूं ॥५१३॥**

**मराठी अर्थ** - हे नित्य कल्याणरूप देवा, महाराजा, तू त्रैलोक्याला आश्रय आहेस. तू अविनाशी आहेस. देवा, सत् व असत् तूच आहेस व त्यापलीकडील जे तेही तूच आहेस.

**गुह्यार्थ** - मायेच्या योगे बुद्धिवादी लोक आत्मा व परमात्म्याचे एकरूप होणे म्हणजे आत्मसाक्षात्कार म्हणतात. देवांना परमात्मा समजतात, विष्णूंना परमात्मा समजतात, पण परमात्मा गीतेद्वारे उपदेश करताना असे म्हणतात की, मी अनादी आहे, मी निराकार आहे, मी स्वयंसिद्ध आहे, मी सर्वांमध्ये आहे. तरीही मी त्यापासून वेगळा व अतिशुद्ध आहे, सत्य व असत्य या दोन्हीही बदलणाऱ्या अवस्था आहेत, म्हणजे जे बदलतं ते कसं अद्वैत असू शकत? म्हणून या दोहोंपलिकडचा मी आहे.

या संदर्भात संत कबीरांची दोहा -
सत्य असत्य कोही मैने खाक मिलाया।

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **अकरावा**, ओवी - ६९७

**दृष्टादृष्ट सकळ । जयाचें मीचि केवळ ।**
**जेणें जिणयाचें फळ । मजचि नाम ठेविलें ॥६९७॥**

**मराठी अर्थ** - ज्याचा इहपरलोक, हे सर्व केवळ मीच होऊन राहिलो आहे व ज्याने आपले जगण्याचे प्रयोजन माझीच प्राप्ति होणे, हेच ठरविले आहे.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, देवोदुर्लभ मनुष्य जन्माचे खरे प्रयोजन ही माझीच प्राप्ती आहे, केव्हा होईल, जेव्हा सद्गुरू कृपेने महावाक्याचा बोध या आत्मज्ञानाद्वारे शक्य होईल. तेच परमात्म्याचे खरे वचन होय.

# अध्याय - बारावा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - २

**विषयव्याळें मिठी । दिधलिया नुठी ताठी ।**
**ते तुझिये गुरुकृपादृष्टी । निर्विष होय ॥२॥**

**मराठी अर्थ** - विषयरूपी सर्पाने दंश केला असता मुर्च्छा येते, ती काही केल्या जात नाही. हे गुरुकृपादृष्टी, तुझ्या योगाने ती मुर्च्छा नाहीशी होते आणि सर्पदंश झालेल्या प्राण्याची त्या (विषय) विषापासून सुटका होते.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, विषयामध्ये म्हणजेच मायेत अडकलेला मनुष्य मुर्छित झाल्यासारखा या संसाराच्या रहाटगाडग्यामध्ये अडकून पडतो, तर याची सुटका ही केवळ परमात्म्याचे वचन सद्गुरु कृपेने महावाक्याच्या बोधाने म्हणजेच आत्मज्ञान काय आहे ते जाणल्यावरच होऊ शकते, ती रीतपद्धत केवळ पुर्णत्वाला गेलेले सद्गुरुच दाखवू शकतात.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - १४

**पाखांडाचे दरकुटे । मोडीं वाग्वाद अव्हांटे ।**
**कुतर्कांचीं दुष्टें । सावजें फेडीं ॥१४॥**

**मराठी अर्थ** - (माझ्या देशी- भाषारूप पृथ्वीवर पुढील गोष्ट नकोत, असे ज्ञानेश्वर महाराज आपल्या गुरूंना म्हणतात.) नास्तिकपणारूपी दया व विंतंडवादरूपी आडवाटा नाहीशा कर आणि कुतर्करूपी दुष्ट जनावरे हाकून दे.

**गुह्यार्थ** - परमात्मा ज्ञानेश्वर माऊलींच्या माध्यमातून मार्गदर्शन करताना असे म्हणतात की, या सृष्टीमध्ये मनुष्य हा एकमेव प्राणी आहे जो मला अतिशय प्रिय आहे, कारण केवळ तोच माझे वचन जाणून मजप्रत् येऊ शकतो, तेव्हा या माझ्यापर्यंत येण्याच्या प्रवासामध्ये ज्या आडवाटा आहेत, म्हणजेच मायेमध्ये श्वासाला धरून चाललेले सर्व व्यवहार म्हणजेच हे तोडून इडा - पिंगळाच्या पलीकडे सुषुम्नेच्या मार्गाने अभ्यासाद्वारे मजप्रत येण्याचा प्रयत्न कर. या प्रवासामध्ये जी आडवाट वर नमूद केली ती मध्ये जीवस्थिती येथे आपण शरीरकार्य करण्यासाठी श्वास घेतो व सोडतो, तसेच ईश्वर जे बुद्धीद्वारे सुचवतो, ती सर्व कर्मे करतो. योग, याग, नामस्मरण, तीर्थाटन, श्वासाला धरून तर सद्गुरु कृपेने ब्रम्हवाक्याच्या बोधाने जो अभ्यास करतो त्या अभ्यासामध्ये देणे व घेणे येते त्यास निष्काम कर्म म्हणता येईल.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - १६

**मऱ्हाठीयेचा नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करी ।**
**घेणें देणें सुखचिवरी । हों देई या जगा ॥१६॥**

**ज्ञानेश्वरी**

अध्याय - **बारावा**, ओवी - २२

**आणि इये कृष्णमूर्तीची सवें । यालागीं सोय धरिली जीवें ।**
**तंव नको म्हणौनि देवें । वारिलें मातें ॥२२॥**

**मराठी अर्थ** - या मराठी भाषेच्या गावात आत्मज्ञानाची रेलचेल कर व या जगाला केवळ ब्रम्हसुखाचेच घेणे देणे होऊ दे (१६) आणि (मला) या श्रीकृष्णाच्या सगुण रूपाची सवय आहे, म्हणून

मनाने त्याचाच आश्रय केला. तेव्हा सगुण मूर्तीवर प्रेम ठेवणे चांगले नाही म्हणून तेथे प्रेम ठेवू नकोस असे देवांनी मला बजावले. (२२)

**गुह्यार्थ -** (ओवी क्रमांक १६ आणि २२ मिळून) परमात्मा मार्गदर्शन करताना असे सांगतात, मायेमध्ये बुद्धिवादी जीव असा प्रश्न करतात की, सगुण भक्ती श्रेष्ठ की, निर्गुण भक्ती? परमात्मा मार्गदर्शन करताना असे म्हणतात, की सगुण (रज, सत्व, तम) (श्वास) भक्तीची व्याख्या अशी केली जाते तेव्हा म्हणता येईल की, जी गुणासहित केली जाते, शरीराला, श्वासाला धरून केली जाणारी कर्मे, योग, याग, नामस्मरण हे सर्व असत्य व हे शरीर म्हणजे नाशवंत आहे, तर या सगुणावर प्रेम करू नकोस असे परमात्मा म्हणतात, तर निर्गुण भक्ती म्हणजेच असे म्हणता येईल की, त्या निराकार परमात्म्यास जाणण्यास सद्गुरुकृपेने जे आत्मज्ञान जाणून, निष्काम कर्म होते, ती निर्गुण भक्ती. परमात्मा म्हणतात की, या गुणांच्या पलीकडे म्हणजेच गुणातीत व अविनाशी असा अतिशुद्ध मी आहे, त्या निराकारावर तुम्ही प्रेम करा, हेच तुमचे अंतिम ध्येय होय.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **बारावा**, ओवी - २३

**तरि व्यक्त आणि अव्यक्त । हें तूंचि एक निभ्रांत ।**
**भक्ती पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥२३॥**

**मराठी अर्थ -** तर व्यक्त रूपाने अथवा अव्यक्त रूपाने तूच एक आहेस, याविषयी (माझ्या मनात) संशय नाही, भक्तीने व्यक्त स्वरूपाची व योगाने अव्यक्तस्वरूपाची प्राप्ति होते.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, श्वासाला धरून मायेमध्ये ईश्वर बुद्धिवाटे जे सुचवतो त्यातून होणारी जी कर्म होतात, योग, याग, तीर्थाटन, माळ, भंडारखाना हे सर्व कर्म होय, यामधून फळ हे प्राप्त होणारच. याद्वारे तुम्ही ईश्वराला म्हणजेच मायेच्या अधिपतीला प्राप्त करू शकता व पुन्हा जन्म - मरणाच्या फेऱ्यात अडकता. हे जे भक्तीचे व्यक्त स्वरूप आहे व जर तुम्ही सद्‌गुरु कृपेने महावाक्याच्या बोधाने परमात्म्याच्या अव्यक्त व निराकारी स्वरूप जाणण्याचा अभ्यास आत्मस्थितीत करता ते निष्काम कर्म होय, त्यातून फळ तयार होत नाही, तुम्ही परमात्म्याप्रत पोहोचता, जन्म - मरणाचे फेरे थांबतात व तुम्ही निरंतर टिकणाऱ्या सच्चिदानंद - हिरण्यगर्भ अवस्थेत राहता.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - ५०
**वज्राग्नीचां ज्वाळीं । करूनि अपानधातूंची होळी ।**
**व्याधींचा सिसाळीं । पूजिलीं यंत्रें ॥५०॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - ५१
**मग कुंडलीनीयेचा टेंभा । आधारीं केला उभा ।**
**तया चोजवलें प्रभा । निमथावरी ॥५१॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - ५२
**नवद्वारांचिया चौचकीं । बाणूनि संयतीची आडवंकी ।**
**उघडली खिडकी । ककारांतींची ॥५२॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - ५३
**प्राणशक्तिचामुंडे । प्रहारूनि संकल्पमेंढे ।**

**मनोमहिषाचेनि मुंडें । दिधलीं बळी ॥५३॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - ५४

**चंद्रसूर्यां बुझावणी । करूनि अनाहताची सुडावणी ।**
**सतरावियेचें पाणी । जिंतिलें वेगें ॥५४॥**

**मराठी अर्थ** - वज्राग्नीच्या ज्वाळाने अपानरूप धातूंची होळी करून, रोगरूपी मुंडक्यांनी प्राणायामरूपी तोफा पूजिल्या. (५०) मग कुंडलिनीची मशाल आधार चक्रावर उभी केली व तिच्या प्रकाशाने ब्रम्हरंध्रापर्यंत मार्ग समजला. (५१) शरीरातील नवहि व्दारांच्या कवाडांवर संयमाचा अडसर घालून सुषुम्ना नाडीचे मुख उघडले. (५२) प्राणशक्तिरूपी चामुंडा देवीला संकल्परूपी मेंढे मारून व मनोरूपी महिषाचे मस्तक, हे बळी दिले. (५३) इडा व पिंगळा नाड्यांचा सुषुम्नेत प्रवेश करून अनाहन शब्दांचा गजर खुला केला व चंद्रामृत त्वरेने जिंकून घेतले. (५४)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक ५०, ५१, ५२, ५३ आणि ५४ मिळून) परमात्मा अभ्यासाविषयी मार्गदर्शन करताना असे म्हणतात की, हा देवोदुर्लभ मनुष्य जन्म मिळाला त्याचे सार्थक करून तुम्ही सद्‌गुरू कृपेने तत्वमसि अभ्यास घेतल्यानंतर त्या अभ्यासायोगे तुम्ही शरीरातील मायेच्या नऊ दारांपलीकडे पहावे ब्रम्हरंध्रापर्यंतचा प्रवास करावा. आत्मस्थितीत अभ्यास करताना पहिल्या अभ्यासामध्ये प्राणाचा प्रणव होतो म्हणजेच कुंडलिनी अधोची उर्ध्वमुख हा प्रणवचा अभ्यास, इडा - पिंगळेचा मार्ग भेदून प्राण सुषुम्नेच्या मार्गाने ब्रम्हरंध्रापर्यंतचा

प्रवास करतो, हा सोऽहंचा मार्ग, त्याद्वारे अभ्यासू व्यक्ती परमात्म्याप्रत पोहोचते व त्या स्थितीचा आनंद आपण घेतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - १४०
**म्हणौनि यावया शांती । हाचि अनुक्रमु सुभद्रापती ।**
**म्हणौनि अभ्यासुचि प्रस्तुतीं । करणें एथ ॥१४०॥**

**मराठी अर्थ** - म्हणूनच अर्जुना, शांती प्राप्त होण्याकरिता हाच (आता सांगितलेला) काय तो क्रम आहे (म्हणून) सांप्रतकाळी तुला अभ्यासच केला पाहिजे.

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, केवळ तत्वमसिच्या अभ्यासाद्वारे तुम्ही वाहतं पाणी शांत करू शकता, म्हणजेच बारा बोटे वाहणारा श्वास, एक अंगुष्ठाण या प्रमाणावर आणल्यावर अभ्यासू व्यक्ती संतच होते, मग त्या परमात्म्याप्रतच्या अवस्थेतच कायम राहणेचा आनंदच निराळा. यासाठी संतांनी सांगितलेल्या रितपद्धतीने तत्वमअसीचा हा अंतिम मार्ग आहे व यासाठी सांप्रत अभ्यासच केला पाहिजे, हा परमात्मा येथे ठासून अभ्यासाचे महत्व सांगतात, हेच जनसामान्यांनी जाणून घ्यावे ही विनंती.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - १८७
**येरा नाम मी ठेवी । मज भजती वोज बरवी ।**
**न भजतया दावी । योगिया जो ॥१८७॥**

**मराठी अर्थ** - व दुसऱ्या भागाला मी (देव) असे नाव ठेवतो. याप्रमाणे देव व भक्त, या दोन्ही कल्पना आपल्यातच सारख्या

कल्पून अद्वैतात भजन करणे शक्य नाही अशा समजुतीने भजन न करणाऱ्या लोकांना, जो योगी, भजनाची चांगली पद्धत (आचरून) दाखवतो

**गुह्यार्थ** - परमात्मा म्हणतात की, जो मनुष्य देव म्हणजेच परमात्मा व मी वेगळा आहे तसेच मी देह या अज्ञानात आहे ते द्वैत मानतात व जीवस्थितीमध्ये बुद्धीद्वारे योग, याग, भजन, कीर्तन, जप, नामस्मरण करतात तत्वमसि महावाक्याच्या बोधाद्वारे अभ्यासू व्यक्ती जो अभ्यास करतात तेच अद्वैतातील भजन म्हणतात व अभ्यासू व्यक्ती मी देह नाही हे ज्ञानाने समजतात. म्हणून परमात्मा म्हणतात की, त्याच्या भजनाच्या छंदात म्हणजेच अभ्यासात माझा प्रवेश असतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - २३३
**परी मातें परम करूनि । इयें अर्थीं प्रेम धरूनि ।**
**हेंचि सर्वस्व मानूनि । घेती जे पैं ॥२३३॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - २३४
**पार्था गा जगीं । तेचि भक्त तेचि योगी ।**
**उत्कंठा तयांलागीं । अखंड मज ॥२३४॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - २३५
**ते तीर्थ ते क्षेत्र । जगीं तेंचि पवित्र ।**
**भक्तिकथेसि मैत्र । जयां पुरुषां ॥२३५॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **बारावा**, ओवी - २३६

**आम्हीं तयांचें करूं ध्यान । ते आमुचें देवतार्चन ।**
**तेवांचूनि आन । गोमटें नाहीं ॥२३६॥**

**मराठी अर्थ** - परंतु जे मला श्रेष्ठ प्राप्तव्य समजतात व या भक्तितत्वाविषयी आपल्या मनात प्रेम बाळगून व हेच आपले सर्व भांडवल आहे, अशी समजूत ठेवून, जे या भक्तियोगाचा अंगीकार करतात. (२३३) अगा अर्जुना, या जगामध्ये तेच भक्त व तेच योगी आहेत व त्यांची मला निरंतर उत्कंठा लागलेली असते. (२३४) तेच तीर्थ, तेच क्षेत्र, जगामध्ये तेच पवित्र की, ज्या पुरुषांचा भक्तिकथेशी स्नेह असतो. (२३५) आम्ही त्याचे ध्यान करू, ते आमची पूजन करण्याची देवता आहेत, त्यांच्यावाचून आम्ही दुसरे काही चांगले मानित नाही. (२३६)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक २३३, २३४, २३५ आणि २३६ मिळून) परमात्मा अभ्यासू व्यक्तीविषयी सांगताना असे म्हणतात, जे मनुष्य तत्वमसि सांप्रत अभ्यास करतात व अभ्यासाने माझी मुक्तीवरील भक्ती करतात, तेच माझे खरे भक्त व तेच योगी आहेत व त्यांची मला निरंतर उत्कंठा लागलेली असते तेच तीर्थ, तेच क्षेत्र, जगामध्ये तेच पवित्र की, ज्यांचा अभ्यासाशी स्नेह असतो. आम्ही त्यांचे ध्यान करू, तेच आमची पूजन करण्याची देवता आहेत. त्यांच्यावाचून आम्ही दुसरे काही चांगले मानित नाही. त्यांचे आम्हास व्यसन असते व तेच आमच्या ठेव्याची खाण आहेत. फार काय सांगावे, ते आम्हाला भेटतात तेव्हा आम्हाला समाधान वाटते.

# अध्याय - तेरावा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - तेरावा, ओवी - ४
**भावाचें अवतरण । अवतरविती खूण ।**
**हाता चढें संपूर्ण । तत्त्वभेदें ॥४॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - तेरावा, ओवी - ५
**श्रीगुरूंचे पाय । जैं हृदय गिंवसूनि ठाय ।**
**तैं येवढें भाग्य होय । उन्मेषासी ॥५॥**

**मराठी अर्थ** - निरनिराळ्या तत्वांतील फरक दाखवून अभिप्रायाची स्पष्टता करणारी जी मार्मिक खूण, ती सर्वच्या सर्व स्वाधीन होते. (४) जेव्हा हृदय श्रीगुरूंचे पाय धरून राहाते, तेव्हा ज्ञानाला एवढे दैव प्राप्त होते. (५)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक ४ आणि ५ मिळून) परमात्मा अभ्यासाचे महत्व असे सांगतात की, सद्‌गुरुकृपांकित मनुष्य अभ्यास करताना परमात्माप्रत जाण्याच्या मार्गामध्ये त्यांना ठराविक खुणा किंवा चिन्हे होतात. त्याविषयी अधिकच्या पुराव्यासाठी खालील श्लोक -

(१) सेना म्हणे खूण सांगीतली संती, परत विश्रांती न मिळे जीवा - सेना महाराज.

(२) ज्ञानदेव खूण सांगितली निवृत्तीराय.

ही चिन्हे केवळ आणि केवळ अभ्यासानेच समजून घेता येतात. त्याचसाठी सद्‌गुरुचरण म्हणजेच अभ्यासच करावा लागेल.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तेरावा**, ओवी - २७
**एक म्हणती हें स्थळ । जीवाचेंचि समूळ ।**
**मग प्राण हें कूळ । तयाचें एथ ॥२७॥**

**मराठी अर्थ** - कित्येक (जीववादी) असे म्हणतात की, क्षेत्र हे स्थळ जीवाचेच संपूर्ण आहे, मग प्राण हे त्याचे येथे कूळ आहे. (जीव हा घरचा एकटाच असल्यामुळे व त्याच्या घरी शेतकी चालविण्याचा बारदाना बैल व नांगर, गडी, माणसे वगैरे नसल्यामुळे, त्याने हे क्षेत्र प्राण या कुळात बटाईने दिले, कारण प्राण या कुळाजवळ शेतकी चालविण्याचा सर्व बारदाना आहे).

**गुह्यार्थ** - परमात्मा मार्गदर्शन करताना असे सांगतात की, देहावाटेच जीव सुख - दुःख भोगतो, तर ते सुख - दुःख हा प्राणच तयार करतो आणि या सुख - दुःखामार्फतच त्या जीवाकडून पाप - पुण्य तयार होते, म्हणून जीव जन्म - मरणाच्या फेऱ्यात अडकतो. तर सद्गुरु कृपेने तत्वमसि महावाक्याच्या बोधाने अभ्यासाद्वारे प्राणाचा प्रणवच करणे (निष्काम कर्म) होय. म्हणजेच तो जन्म - मरणाच्या फेऱ्यातून सुटेल. याकरिता पुढील दोन ओव्या हा पुरावा मानला जाईल.

(१) प्राण अधो तो ऊर्ध्व करावा, व्याण नाडीया काढावा,
ऊर्ध्वबळे ओढावा, न्यावे दसवे द्वारी.
(२) आजपा जप उलट प्राणाचा, तेथेचि मनाचा (श्वासाचा)
निर्धारू असे.

(३) कबीर असे म्हणतात, मन (श्वास) मरे, माया मरे, मर मर जात शरीर.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तेरावा**, ओवी - ८८

**जे तेजतत्त्वांची आदी । जे सत्त्वगुणाची वृद्धी ।**
**जे आत्मया जीवाची संधी । वसवीत असे ॥८८॥**

**मराठी अर्थ** - जी तेज तत्वाचे उत्पत्तिस्थान आहे, जी सत्व गुणाची वाढती अवस्था आहे आणि जी आत्मा व जीव यांच्यामधील जागेत राहते.

**गुह्यार्थ** - परमात्मा मार्गदर्शन करताना असे सांगतात की, या जीवस्थितीमध्ये जीवाला ईश्वर बुद्धिवाटे जे सुचवतो त्यातून होणारी सर्व कर्म होय, यालाच जीवाला लागलेली दशा म्हणजे जीवदशा असे म्हणता येईल. तर सद्गुरु कृपेने तत्वमसिच्या अभ्यासाने जी अवस्था होते ती आत्मस्थिती होय. या स्थितीमध्ये परमात्मा स्वतः स्फुरवतो व ज्ञानेश्वर माऊलींनी हे महाज्ञान या ग्रंथामध्ये सांगितले आहे, हे आत्मस्थितीतून स्वत: परमात्म्याने त्यांना स्फुरण केले आहे तेव्हा बुद्धीने याचा अर्थ लावणे मुर्खपणाचे होईल. म्हणून ज्ञानेश्वरी ही केवळ अभ्यासाने आकलन करता येईल.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तेरावा**, ओवी - १२९

**जयाचेनि जालेपणें । पांगुळा होईजे प्राणें ।**
**सात्त्विकासी दुणें । वरीही लाभु ॥१२९॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तेरावा**, ओवी - १३१
**किंबहुना सोये । जीव आत्मयाची लाहे ।**
**तेथ जें होये । तया नाम सुख ॥१३१॥**

**मराठी अर्थ** - जे उत्पन्न झाले असता प्राण पांगळा (शांत) होतो व सात्विक वृत्ती पूर्वीपेक्षा दुपटीच्या वर वाढते. (१२९) फार काय सांगावे! जीवाला आत्म्याचा लाभ (ऐक्य) ज्या वेळी प्राप्त होतो, तेथे जी स्थिती होते, त्या स्थितीला सुख हे नाव आहे. (१३१)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक १२९ आणि १३१ मिळून) परमात्मा मार्गदर्शन करताना सांगतात की, सद्गुरु कृपेने अभ्यासायोगे मनुष्य आत्मस्थितीत प्राणाचा प्रणव केल्याने कुंडलीनीचे अधोचे ऊर्ध्वमुख होते व अभ्यासाने परमात्माप्राप्तीच्या ज्या अवस्थेत आपण जातो, त्यामध्ये जे सुख व आनंद मिळतो, ते अंतिम सुख व सत्य होय, त्यास पुरावा.

**जन्माचे जे मुळं शोधूनि पाहिले,**
**दुःखासी कारण जन्म घ्यावा ॥** - तुकाराम महाराज,

रज, तम ज्याचे अंगी, तेने जगी वाया गेला,
तुका म्हणे येथे सत्वाचे सामर्थ्य, करावा परमार्थ अहर्निशी

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तेरावा**, ओवी - २४९
**ते वाट कृपेची करितु । ते दिशाचि स्नेहाभरितु ।**
**जीवातळीं आंथरितु । आपुला जीवु ॥२४९॥**

**मराठी अर्थ -** तो ज्या रस्त्याने चालतो तो रस्ताच कृपेने भरतो व ज्या बाजूकडे त्याची नजर जाते, ती दिशाच तो प्रेमाने भरलेली करतो व प्राण्यांच्या खाली आपला स्वतःचा प्राण आंथरतो

**गुह्यार्थ -** परमात्मा अभ्यासू व्यक्तीचे महत्व सांगताना असे म्हणतात की, सद्‌गुरु कृपांकित अभ्यासू व्यक्ती ज्या दिशेने जातात, ती दिशा, ज्या वाटेने जातात ती वाट, जेथे जातात ती जागा पवित्र होते, इतके अभ्यासू व्यक्तीचे महत्व परमात्याठायी असते, असे म्हणता येईल. हरिच्या दासा, शुभकाळ सर्व दिशा ।

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **तेरावा**, ओवी - ६१५
**तरी परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे ।**
**तें जया दिसें । ज्ञानास्तव ॥६१५॥**

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **तेरावा**, ओवी - ६१६
**तें एकवांचूनि आनें । जियें भवस्वर्गादि ज्ञानें ।**
**तें अज्ञान ऐसा मनें । निश्चयो करी ॥६१६॥**

**मराठी अर्थ -** तर परमात्मा म्हणून जी एक वस्तू आहे, ती ज्या ज्ञानामुळे अनुभवाला येते, (६१५) त्या अध्यात्मज्ञानावाचून, इतर जी स्वर्ग व संसार यासंबंधीची ज्ञाने आहेत, ती अज्ञाने आहेत, असा जो मनाने निश्चय करतो. (६१६)

**गुह्यार्थ -** (ओवी क्रमांक ६१५ आणि ६१६ मिळून) परमात्मा मार्गदर्शन करताना असे म्हणतात की, सद्‌गुरु कृपेने तत्वमसिच्या अभ्यासाने परमात्मा म्हणजे काय याचे ज्ञान होणे

व त्या परमानंदाचा अनुभव होणे त्या आत्मस्थितीत परमात्म्याप्रत जाण्याच्या अवस्थेचा आनंद घेणे हेच खरे अध्यात्म. यावाचून जीवस्थितीतील बुद्धिवाटे सुचणारे सर्व स्वर्गादी विचार म्हणजे अज्ञान होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तेरावा**, ओवी - ६२२

**तयाच्या ठायीं ज्ञान । या बोला म्हणसी व्यवधान ।**
**जे ज्ञानीं बैसलें मन । तेव्हांचि तें तो ॥६२२॥**

**मराठी अर्थ** - त्याच्या ठिकाणी ज्ञान आहे, या माझ्या बोलण्यात आडपडदा आहे, असे जर अर्जुना, तू म्हणशील (तर तुला स्पष्ट सांगतो की) जेव्हा त्या पुरुषाचे मन ज्ञानाच्या ठिकाणी स्थिर झाले, तेव्हाच तो (पुरुष) ते (ज्ञान) झाला.

**गुह्यार्थ** - परमात्मा असे म्हणतात की, सद्गुरुकृपेने तत्वमसि महावाक्याच्या बोधाच्या अभ्यासाने ज्ञान झालेली व्यक्ती जेव्हा जीवस्थितीतून निघून आत्मस्थितीत जातो म्हणजे तो तत्वमसि महावाक्याचा पहिला अभ्यास घेतो, तो स्वतःच ते ज्ञान होतो. म्हणजेच असे म्हणता येईल की, सांगणाराच जेव्हा सांगते होतो, ती अवस्था म्हणजेच अद्वैत, हेच खरे अध्यात्म होय.

**आध्यात्म साच नव्हे शास्त्र, संसार जेनेते शस्त्र,**
**प्रत्येक्षात आत्मा अवतरियेजे मंत्र, अक्षरी ।**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तेरावा**, ओवी - ८८४

**वांचूनि हस्त नेत्र पाये । हें भाष तेथ कें आहे? ।**
**सर्व शून्याचा न साहे । निष्कर्षु जें ॥८८४॥**

**मराठी अर्थ -** एऱ्हवीं ब्रम्ह हे सर्व शून्य पणाचा शेवट आहे, हाही सिद्धांत ज्या ठिकाणी सह होत नाही, त्या ब्रम्हवस्तूच्या ठिकाणी हात, पाय, डोळे हे बोलणे कोठे आहे.

**गुह्यार्थ -** परमात्मा मार्गदर्शन करताना असे म्हणतात की, सद्गुरु कृपांकित तत्वमसि अभ्यास घेतलेला व्यक्ती जीवस्थितीतून अभ्यासातील आत्मस्थितीत / ब्रम्हस्थितीत जेव्हा जातात तेव्हा शून्यपणाचा म्हणजेच मायेचा शेवट होतो, म्हणजेच जेव्हा मनुष्याला तत्वमसि अभ्यासाद्वारे परमात्मप्राप्तीचे ज्ञान होते व त्या ज्ञानाच्या आनंदात तो सदैव राहतो, त्यावेळी जीव त्याची जीवस्थिती व ब्रम्हस्थिती मध्ये त्याला परमात्माच स्फुरण करतो, कारण जीवस्थितीमध्ये मायेचा म्हणजेच ईश्वराचा संबंध संपतो.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **तेरावा**, ओवी - ९०५

**तें गुण नव्हे कहीं । गुणा तया संबंधु नाहीं ।**
**परी तयाचांचि ठायीं । आभासती ॥९०५॥**

**मराठी अर्थ -** ते (ब्रम्ह) कधीही गुण होत नाही आणि त्याचा व गुणांचा काही एक संबंधही नाही; पण गुण हे, त्याच्याच ठिकाणी भासतात.

**गुह्यार्थ -** परमात्मा म्हणतात की, ज्यावेळी मनुष्य सद्गुरु कृपेने तत्वमसि अभ्यास घेतो त्यावेळी तो जीवस्थिती म्हणजेच सत्व, रज, तम या गुणापलिकडील गुणातीत अशा आत्मस्थितीत जातो. हे करत असताना नियतीच्या नियमामध्ये कोणतीही

ढवळाढवळ न करता म्हणजेच श्वासोच्छ्वासाला धक्का न लावता हा अभ्यास चालत असतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तेरावा**, ओवी - १०९५
**तैसा आत्मा देहीं । आथि म्हणिपे हें कांहीं ।**
**साचें तरी नाहीं । तो जेथिंचा तेथें ॥१०९५॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **तेरावा**, ओवी - १०९६
**आरिसां मुख जैसें । बिंबलिया नाम असे ।**
**देहीं वसणें तैसें । आत्मतत्त्वा ॥१०९६॥**

**मराठी अर्थ** - त्याप्रमाणे आत्मा देहात आहे, असे जे म्हटले जाते ते काही खरे नाही, तर आत्मा जेथे आहे तेथेच आहे. (१०९५) आरशात मुख बिंबले असता, त्यास प्रतिबिंब असे आपण म्हणतो, त्याप्रमाणे देहामध्ये आत्मतत्वाचे राहणे आहे. (देहात आत्म तत्व प्रतिबिंब रूपाने असते.) (१०९६)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक १०९५ आणि १०९६ मिळून) परमात्मा जीवाला उपदेश करताना असे म्हणतात की, आत्मा देहात आहे असे म्हणतात, तसे ते नाही, म्हणून आत्मा हा देहातीत आहे, तर आत्मा हा आत्म्याच्याच ठिकाणी आहे, असे म्हणल्यास वावगे ठरणार नाही. देहामध्ये जी आत्मस्थिती आहे ती आत्म्याची नसून परमात्म्याची स्थिती आहे, म्हणजेच परमात्म्याच्या सत्तेतून तो आपल्याजवळ असल्याचा पुरावा म्हणजे तो परमात्मा प्रतिबिंबित होतो (प्रतिबिंब नव्हे) म्हणून आत्मा हा देहातीत आहे, देहात नव्हे हे समजून घ्यावे.

# अध्याय - चौदावा

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **चौदावा**, ओवी - ४

**तू जयांप्रति लपसी । तया जग दाविसी ।**
**प्रकट तैं करिसी । आघवेंचि तूं ॥४॥**

**मराठी अर्थ** - तू ज्यांना लपतोस त्यांना हे जग दाखवितोस (म्हणजे ज्यांच्यामध्ये तुझ्या संबंधाने अज्ञान असते, त्यांना तुझे स्वरूप न दिसता जग दिसते.) व तू ज्यांना प्रगट होतोस, त्या वेळी त्यांना सर्व तूच करतोस (म्हणजे ज्यांच्यामध्ये तुझ्यासंबंधाने ज्ञान असते, त्यांना जग न दिसता सर्व तूच दिसतोस.)

**गुह्यार्थ** - परमात्मा उपदेश करताना असे सांगतात की, मायेला चिकटलेले, ईश्वराच्या आधीन म्हणजे बुद्धिवाटे भक्ती करणारे लोक परमात्म्याला न जाणता मायाजाळाला भुलतात, मायेचा अधिपती ईश्वर किंवा परमेश्वर यालाच परमात्मा मानून योग, याग, कर्मकांड करतात हेच ते अध्यात्म आहे असे समजून जन्म - मरणाच्या फेऱ्यात आडकतात तर सद्गुरु कृपेने तत्वमसि महावाक्याच्या बोधाचा अभ्यास घेतलेले परमात्माप्राप्तीच्या आनंदात राहतात व परमात्म्याप्रत पोहोचतात आणि हेच अध्यात्म होय. (परमात्माप्रत जाणेचा मार्ग हाच होय.)

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **चौदावा**, ओवी - १०

**किंबहुना माया असोस । ज्ञान जी तुझेनि डोळस ।**
**असो वानणें सायास । श्रुतीसि हें ॥१०॥**

**मराठी अर्थ -** फार काय सांगावे! महाराज, अमर्याद असे जे संपूर्ण अन्यथाज्ञान त्याचेहि प्रकाशक तुम्हीच आहात. हे तुमचे वर्णन राहू द्या (कारण) हे वर्णन करणे श्रुतीलाहि कष्टप्रद आहे.

**गुह्यार्थ -** तत्वमसि अभ्यासाचे मार्गदर्शन करताना परमात्मा म्हणतात की, या मार्गाचा प्रकाशक मी असून, या दिव्यज्ञानाचा अभ्यास मी स्वत: अभ्यासू व्यक्तीकडून करून घेत असतो. तेव्हा अभ्यासू व्यक्तीने सांप्रत अभ्यासच करण्याच्या ध्येयाने व्यतीत रहावे. बाकी मी सर्वकाही करवून घेतो.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **चौदावा**, ओवी - ६६
**पैं क्षेत्र येणें व्याजें । हें यालागीं बोलिजे ।**
**जे मत्संगबीजें । भूतीं पिके ॥६६॥**

**मराठी अर्थ -** माझ्या संगरूपी बीजाने यान (अज्ञानात) प्राणीरूपी पीक येते. याच कारणामुळे याचा (अज्ञानाचा) क्षेत्र या नावाने उल्लेख केला जातो.

**गुह्यार्थ -** परमात्मा मार्गदर्शन करताना असे सांगतात की, देह निर्माण केल्यावर त्याला खाद्य म्हणून श्वासरूपी बीज त्यामध्ये रूजवतात ते या शरीररूपी श्वासामध्ये प्राणांकडून पीक फोफावते (वाढते) (सुख - दुःख) हेच सर्वस्व समजून मनुष्य मी देह या अज्ञानामध्ये अडकतो, त्याचे मूळ कारण हे बीज म्हणजेच श्वास, या श्वासाला (बीज) भाजणे म्हणजेच अंगुष्ठाण होणे,

म्हणजेच देवत्व प्राप्त होणे हे केवळ तत्वमसिच्या अभ्यासाने होईल.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौदावा**, ओवी - २६५
**म्हणौनि बा रे अर्जुना । येथ सत्त्वचि हेतु ज्ञाना ।**
**जैसा कां दिनमाना । सूर्य हा पैं ॥२६५॥**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौदावा**, ओवी - २८४
**परी चोज हें धनुर्धरा । जे एवढा हा गुंफिरा ।**
**मोक्षाचा संसारा । उणा नोहे ॥२८४॥**

**मराठी अर्थ** - म्हणून बा अर्जुना, जसा सूर्य हा दिनमानाला हेतु आहे, तसा येथे सत्वगुणच ज्ञानाला हेतु आहे, (२६५) परंतु अर्जुना, आश्चर्य हे आहे की, एवढे बंधन जीवास असताही, जीवाच्या मुक्त स्थितीला कमीपणा येत नाही. (२८४)

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक २६५ आणि २८४ मिळून) परमात्मा मार्गदर्शन करताना असे सांगतात की, जीवाला जेव्हा श्वास लागतो व मायेचा व्यवहार चालू होतो, तेव्हा ती जीवदशा होय व हेच मनुष्याचे अज्ञान होय व मी व देह हे दोन हे एक आहेत; म्हणजेच अज्ञान पण, जीव हा मूळचा मुक्तच आहे, हे अभ्यासाने जाणने हेच खरे ज्ञान व अध्यात्म होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **चौदावा**, ओवी - २९८
**मी दाऊनि गुण देखे । गुणता हे मियां पोखे ।**
**ययाचेनि निःशेखें । उरे तें मी ॥२९८॥**

**मराठी अर्थ -** मी गुणांचे प्रकाशन करून (परत) गुणांस पाहतो, गुणांच्या ठिकाणी (असणारा) गुणपणा माझ्याकडून पोसला जातो व या गुणांचा निरास झाल्यावर जे उरते, ते मी आहे.

**गुह्यार्थ -** परमात्मा मार्गदर्शन करताना असे सांगतात की, जीवस्थितीतून तत्वमसिच्या अभ्यासाने श्वासाचे बीज भाजून अंगुष्ठाण म्हणजेच देवत्व प्राप्त करण्यासाठी सत्व, रज, तम या पलीकडील गुणातीत अवस्थेत म्हणजेच आत्मस्थितीत गेल्यानंतर म्हणजेच निराकारातून निराकार परमात्म्याच्या अवस्थेत जाणे हेच खरे अध्यात्म होय.

# अध्याय - पंधरावा

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **पंधरावा**, ओवी - ७
**तेथे अहं हा धूप जाळूं । नाहं तेजें वोवाळूं ।**
**सामरस्यें पोटाळूं । निरंतर ॥७॥**

**ज्ञानेश्वरी**
अध्याय - **पंधरावा**, ओवी - २४
**तयापरी श्रीगुरु । करिती जैं अंगीकारु ।**
**तैं होऊनि ठाके संसारु । मोक्षमय आघवा ॥२४॥**

**मराठी अर्थ -** देहादिकांचा अभिनिवेश घेणारी जी अहंवृत्ति हाच कोणी एक धूप, तो श्रीगुरुचरणांजवळ जाळू, या देहादिकांपैकी मी कोणी नाही, अशी जी उत्पन्न झालेली निरभिमान बोधवृत्ती हेच कोणी तेज, त्या तेजाने श्रीगुरुस ओवाळू व त्या सद्‌गुरु चरणास तदाकारतेने नेहमी आलिंगन देऊ. (७) याप्रमाणे श्रीगुरू जेव्हा एखाद्याचा अंगीकार करतात, तेव्हा त्याचे सर्व जिवित सुखमय होऊन राहते. (२४)

**गुह्यार्थ -** (ओवी क्रमांक ७ आणि २४ मिळून) मी देह हे जे अज्ञान आहे, हा जो द्वैतपणा आहे, तो या अहंवृत्तीचा धूप सद्‌गुरुचरणी जाळू व सद्‌गुरुकृपेने हे अज्ञान दूर करून जे खरे ज्ञान आहे, त्या तत्वमसिच्या अभ्यासाने सद्‌गुरूंना ओवाळू, ते सद्‌गुरु म्हणजेच निराकार परमात्मा व त्यांनी जेव्हा एखाद्या शिष्याचा अंगीकार केला तेव्हा त्याचा परमार्थ व प्रपंच अध्यात्मातील सुखमय होऊन जातो, तेच खरे अध्यात्म होय.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - पंधरावा, ओवी - २२०

**तरी कोणाचेनि संतानें । निपजती तया उन्मूळणें ।**
**काय फुंकिलिया गगनें । जाइजेल गा ॥२२०॥**

**मराठी अर्थ -** तर कोणता असा मायेचा पूत आहे की ज्याच्या सामर्थ्याने याची पाळेमुळे खणून काढण्याचे काम घडून येईल? अर्जुना, नुसत्या फुंकण्याचे हे (एवढे) आकाश उडून जाईल काय?

**गुह्यार्थ -** परमात्मा अभ्यासू व्यक्तीचे महत्व सांगताना असे नमूद करतात की, या ब्रम्हांडात एकच असा मायेचा पुत्र आहे, जो सद्‌गुरुकृपेने तत्वमसिच्या अभ्यासाने या संसाररूपी वृक्षाची म्हणजे माया अथवा श्वासांचा वृक्ष उखडून टाकेल, पण त्याच्या मुळाला धक्का न लावता, म्हणजेच तत्वमसिच्या अभ्यासाद्वारे श्वासाला धक्का न लावता, नियतीच्या नियमामध्ये बदल न करता जीवस्थितीतून आत्मस्थितीत अभ्यासाद्वारे परमात्म्याप्रत जाण्याच्या सोऽहंच्या मार्गाने खरा अध्यात्म जाणणारा मनुष्य श्वासाच्या बिजाला भाजून, अंगुष्ठाण साधून, देवत्व प्राप्त करतो व संत होतो.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - पंधरावा, ओवी - २२७

**वाजतें वारें निवांत । जंव न राहे जेथिंचें तेथ ।**
**तंव तरंगतां अनंत । म्हणावीचि कीं ॥२२७॥**

**मराठी अर्थ -** जोपर्यंत वाहणारा वारा जागच्या जागी शांत राहत नाही, तोपर्यंत लाटपणा अनंतच म्हटला पाहिजे.

**गुह्यार्थ** - परमात्मा अभ्यासाविषयी मार्गदर्शन करताना असे म्हणतात की, अभ्यासाने शिष्याला अंतिम प्रमाण काय? तर सद्‌गुरु कृपेने, तत्वमसि महावाक्याच्या बोधाने जीवस्थितीतील बारा बोटे वाहणारा श्वास जेव्हा एक अंगुष्ठाण या प्रमाणापर्यंत येतो, तेव्हा तो संत होतो. हेच त्या शिष्याचे देवत्वाचे प्रमाण होय.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पंधरावा**, ओवी - ३३७

**कां कल्पांतींचिया पाणिया। काय वोत भरताती धनंजया।**
**म्हणौनि कैंचें अंश अविक्रिया। एका मज ॥३३७॥**

**मराठी अर्थ** - अथवा कल्पांतकाळाचे जे आब्रम्हस्तंबपर्यंत उदक असते, त्याचे पाट फुटून प्रवाह वाहतात काय? एवढयाकरिता मी जो एक अविकारी, त्या मला अंश कोठले?

**गुह्यार्थ** - परमात्मा जीवाला उपदेश करताना असे सांगतात की, मी एक अविकारी अनादी - अनंत व अतिशुद्ध असा आहे, मी सर्वांमध्ये आहे (आत्मा) परंतु माझ्यात कोणीही नाही, त्याकरिता असे सांगता येईल की,

**आदम को खुदा मत कहो, आदम खुदा नहीं हैं,**
**लेकीन आदम खुदा के नूर से जुदा नहीं है।**

आणि सूर्याचे उदाहरण देऊन असे सांगतात की, सूर्य ब्रम्हांडाच्या सर्व व्यवहाराला जबाबदार आहे, पण तो त्या व्यवहारात कोठेही येत नाही, परंतु या मायेमुळे, जीव, ईश्वर

बुद्धी अशा स्थिती निर्माण होतात. त्या स्थितीत परमात्मा ज्यावेळी प्रतिबिंबित होतो, त्यावेळी त्या जीवाला श्वासाची दशा लागले, तेव्हा तो जीवदशेमध्ये अडकतो व मी देह हे अज्ञान करून घेतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **पंधरावा**, ओवी - ३५४
**तैसा आपलिया विस्मृती । आत्मा आपणचि प्रकृती ।**
**सारिखा गमोनि पुढती । तियेसीचि भजे ॥३५४॥**

**मराठी अर्थ** - त्याप्रमाणे आत्मा आपल्या मूळस्वरूपाच्या विसरामुळे, आपण शरीर आहोत, असे समजून पुन्हा (विषयोपार्जनद्वारा) शरीरालाच भजतो.

**गुह्यार्थ** - परमात्मा असे म्हणतात की, मातेच्या गर्भात असतानाची जी आत्मस्थिती असते ती, मनुष्य पृथ्वीतलावर आल्यावर विसरतो.

(१) गुदाद्वारे मुळ मायेचा प्रवेश.
(२) श्वासाचा अंगीकार.
(३) आवाज.

या तीन गोष्टीमुळे त्याची जीवस्थिती निर्माण झाली. आणि या मायेच्या पाशामुळे तो सोऽसं (सो - म्हणजे आत्मा व हं - म्हणजे मी) ही आत्मस्थिती तो विसरला व त्याचा कोऽहं (मी कोण) हा विकासला, त्यामुळे मी देह हे त्याचे अज्ञान तयार झाले. यातून त्याला जर पुन्हा गर्भातील अवस्थेत म्हणजेच आत्मस्थितीत पुन्हा जायचे असेल तर सद्‌गुरु कृपेने तत्वमसि महावाक्याच्या बोधाच्या अभ्यासाने शक्य आहे आणि तो मार्ग म्हणजेच 'आकाशमार्ग गुप्तपंथ' होय.

# अध्याय - सोळावा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सोळावा**, ओवी - १

**मावळवीत विश्वाभासु । नवल उदयला चंडांशु ।**
**अद्वयाब्जिनीविकाशु । वंदूं आतां ॥१॥**

**मराठी अर्थ** - विश्वाच्या आभासाला नाहीसा करणारा (बाधित करणारा) व अद्वैतस्थितीरूपी कमळाचा विकास करणारा, हा (श्रीगुरूनिवृतिरुपी) आश्चर्यकारक सूर्य उगवला आहे. (हा सूर्य आश्चर्यकारक आहे, कारण लौकिक सूर्य हा उगवला असता जगताचे प्रकाशन करतो व द्वैत वाढवितो आणि हा श्रीगुरुरुपी सूर्य जगदाभास नाहीसा करतो व अद्वैतस्थितीचा विकास करतो) त्याला आता आम्ही नमस्कार करतो.

**गुह्यार्थ** - मनुष्य नावलौकिक, प्रसिद्धीमध्ये अडकला की द्वैतभाव उत्पन्न होतो व तो वाढतो आणि तो भासमान या दुनियेत गुरफटला जातो. (ब्रम्हंसत्यमं, जगनमिथ्यां) याउलट सद्‌गुरुरूपी सूर्य हा जगदाभास नाहीसा करून अद्वैत स्थितीचा विकास करतात. त्या समर्थ सद्‌गुरूंना आमचे नमन असो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सोळावा**, ओवी - ५१

**येवढेया लाठेपणाचा उपावो । आनु नाहींचि म्हणे देवो ।**
**हा सम्यक्‌ज्ञानाचा रावो । उपायांमाजीं ॥५१॥**

**ज्ञानेश्वरी**
अध्याय - **सोळावा**, ओवी - ५२
**ऐसे आत्मजिज्ञासु जे होते । तिहीं तोषलेनि चित्तें ।**
**आदरें तया ज्ञानातें । वोंवाळिलें जीवें ॥५२॥**

**मराठी अर्थ** - (प्रपंचाचा बाध करून जीवाला ब्रम्हसाक्षात्कार करून देणारा, ज्ञानाशिवाय) एवढ्या सामर्थ्यांचा दुसरा उपाय नाहीच, हा यर्थार्थज्ञानाचा उपाय सर्व उपायांमध्ये राजा आहे, असे देव म्हणाले.

म्हणून असे जे आत्म्याला जाणण्याची इच्छा करणारे होते त्यांनी संतुष्ट चित्ताने व आदराने त्या ज्ञानावरून आपला जीव ओवाळून टाकला.

**गुह्यार्थ** - (ओवी क्रमांक ५१ आणि ५२ मिळून) सद्‌गुरुकृपेने तत्वमसि महावाक्याच्या बोधाचे ज्ञान, हे मनुष्य जन्माचे अमृत होय आणि सर्वश्रेष्ठ असे हे अंतिमसत्य आहे, हे अंतिम सत्य जाणल्यानंतर मनुष्य अभ्यासायोगे, त्यावरून जीव ओवाळतो, म्हणजेच श्वास हे बीज भाजून 'अंगुष्ट' हे प्राप्त करून देवत्व किंवा परमात्म्या प्रत पोहोचतो.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सोळावा**, ओवी - २१९
**कां विद्या गुरूपदिष्टा । बोभाइलिया चोहटां ।**
**इष्टदा परी अनिष्टा । हेतु होती ॥२१९॥**

**मराठी अर्थ** - अथवा, गुरूने उपदेशिलेली (ब्रम्ह) विद्या ही इष्ट फल देणारी खरी, परंतु ती चव्हाट्यावर प्रसिद्ध केली असता अकल्याणास कारणीभूत होते.

**गुह्यार्थ** - तर सद्‌गुरूंनी सांगितलेला तत्वमसिचा अभ्यास....

नाना साधने उधारीची,
हा ब्रम्हसाक्षात्काराचा रोकडा,
आकाशमार्ग गुप्तपंथ,
योगीये जाणेन समर्थ,
इतरांस हा गुह्यार्थ सहसा न कळे.

म्हणून हे गुह्य जर समजून घ्यायचे असेल, तर सद्‌गुरूंशी शरण जाऊन देवोदुर्लभ अशा मनुष्य जन्माचे सार्थक करावे.

# अध्याय - सतरावा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सतरावा**, ओवी - १७

**जैं सर्वथा सर्वही नोहिजे । तैं अद्वया तूतें लाहिजे ।**
**हें जाणें मी वर्म तुझें । आराध्यलिंगा ॥१७॥**

**मराठी अर्थ** - जेव्हा सर्व प्रकारे सर्व न व्हावे, (म्हणजे जेव्हा कशाची अहंता घेऊ नये) तेव्हा अद्वय जो तू त्या तुझी प्राप्ती होते. हे आराध्यमूर्ते, हे तुझे वर्म मी जाणत आहे.

**गुह्यार्थ** - आकाशमार्ग गुप्तपंथ हा असा एकच मार्ग आहे व त्याचे वर्म असे आहे की, पंचमहाभूतांनी पंचमहाभूतांची आटणी करणे, म्हणून... १. वर्म नाही ठावे, त्यांनी ब्रम्ह कैसे व्हावे. २. राहिले ते वर्म वेगळेची.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **सतरावा**, ओवी - २२

**जे कृत्याकृत्यव्यवस्था । अनुष्ठावया पार्था ।**
**शास्त्रचि एक सर्वथा । प्रमाण तुज ॥२२॥**

**मराठी अर्थ** - अर्जुना, कृत्य व अकृत्य यांची रिती आचरणात आणण्यास तुला एक शास्त्रच पूर्णपणे प्रमाण मानले पाहिजे.

**गुह्यार्थ** - परमात्मा मार्गदर्शन करताना असे सांगतात की, तत्वमसि महावाक्याच्या बोधाच्या अभ्यासाने सद्‌गुरु कृपेचे मार्गदर्शन झाल्यानंतर होणारी ती गुरूप्रचिती होय. गुरुप्रचिती झाल्यानंतर स्वतः अभ्यासायोगे जीव स्थितीतून आत्मस्थितीत जाणे, ही आत्मप्रचिती होय व याला पुरावा म्हणजेच परमात्म्याने माऊलींच्या मुखातून सांगितलेली 'ज्ञानेश्वरी' हीच शास्त्र प्रचिती होय

# अध्याय - अठरावा

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - अठरावा, ओवी - ९
**जयजय देव अद्वितीय । परीणतोपरमैकप्रिय ।**
**निजजनजित भजनीय । मायागम्य ॥९॥**

**मराठी अर्थ** - हे अद्वितीया, परिपक्व झालेल्या वैराग्यवानानेच काय ते फक्त प्रेम असलेल्या, आपल्या दासाच्या स्वाधीन होऊन राहिलेल्या, भजन करण्यास योग्य असलेल्या, मायेच्या ताब्यात न सापडणाऱ्या, श्रीगुरुदेवा, तुमचा जयजयकार असो!

**गुह्यार्थ** - अतिमहान, अतिशुद्ध निराकारी, कशामध्येही न येणारा व मायेच्या ताब्यात न सापडणारा निराकारी सद्‌गुरु असा तो परमात्माच आहे आणि त्या परमात्म्याचा अवतार म्हणजेच आहो 'सद्‌गुरु' तुमचा जयजयकार असो!

**यदा यदाहि धर्मस्यं, ग्लानिर भवतों भारतं....**

जो परमात्मा ज्ञान, तर्क, बुद्धिने न आकळता येण्यासारखा आहे, त्याने ही ज्ञानेश्वरी, ज्ञानेश्वर माऊलींच्या मुखातून ब्रम्हस्थितीतून वदवली (सांगितली) आहे असे अतिश्रेष्ठ पदीचे ज्ञान जरी असले तरी गुह्य हे गुह्यच राहिले आहे.

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - अठरावा, ओवी - २१२
**म्हणौनि प्राचिनाचेनि बळें । आलीं कृत्ये कुशलाकुशलें ।**
**तियें व्योमाआंगीं आभाळें । जिरालीं जैसीं ॥२१२॥**

**मराठी अर्थ** - म्हणून प्रारब्धाच्या बळाने बरीवाईट कर्मे प्राप्त झाली असता, तो आकाशाच्या अंगी जसे ढग जिरून जातात.

**गुह्यार्थ** - मनुष्य वर्तमान स्थितीत जगत असताना, स्वतःला व परमात्म्याला आपल्या कर्माची दूषणे (दोष) देत राहतो, पण सध्य अवस्था ही त्याच्या प्रारब्धानुसार चाललेली आहे. म्हणून प्रारब्ध, संचित, क्रियामान यामुळे त्याला बरी - वाईट कर्म प्राप्त होतात, हे मनुष्याने समजून व कळवून घेतले पाहिजे.

**ठेविले तैसेचि रहावे अनंते,**
**चित्ती असो द्यावे समाधान.**

निवृत्ती महाराज असे म्हणतात -
**निर्गुनाचा संग धरिला जो आवडिने,**
**तेने देशोधडिस लावले आपनायासी ।**

**ज्ञानेश्वरी** - अध्याय - **अठरावा**, ओवी - २५४
**तैसें भोगीं जें फळ होय । तें फळांतरें वीत जाय ।**
**चालतां पावो पाय । जिणिजे जैसा ॥२५४॥**

**मराठी अर्थ** - त्याप्रमाणे, मागील कर्मफल भोगीत असतांना जी कर्म होतात, ती आणखी दुसऱ्या कर्मफलांना उत्पन्न करीत राहतात. चालू लागले की, एक पाय जसा दुसऱ्या पायाला जिंकून पुढे जात असतो.

**गुह्यार्थ** - परमात्मा मार्गदर्शन करताना असे म्हणतात, जीवस्थितीत आपण देहाला धरून केलेले कर्म हे प्रारब्ध कर्म असते आणि त्यापासून आपण सुख - दुःख भोगत असतो आणि हे भोगत असताना नवीन पाप - पुण्ये तयार करतो, म्हणून तो पुन्हा - पुन्हा जन्म - मरणाच्या फेऱ्यात अडकतो.

**ज्ञानेश्वरी -** अध्याय - **अठरावा**, ओवी - ३८०

**कां अहोरात्र सविता । न होनि करी पांडुसुता ।**
**तैसा आत्मा कर्मकर्ता । न होनी दावी ॥३८०॥**

**मराठी अर्थ -** अर्जुना, सूर्य हा दिवस व रात्र न होता जशी दिवस व रात्र आपल्या अस्तित्वावर दाखवितो, त्याप्रमाणे आत्मा हा कर्म व कर्माचा कर्ता न होता त्या दोघांचे प्रकाशन करतो.

**गुह्यार्थ -** परमात्मा असे सांगतात की, सूर्य जसा दिवस व रात्र आपल्या अस्तित्वावर दाखवतो कसे तर, स्वतः दिवस रात्र न होता, तसा आत्मा हा कर्म किंवा कर्माचा कर्ता न होता, त्या दोघांचे प्रकाशन करतो म्हणून तो स्थितप्रज्ञ आणि कुटस्त राहतो. आत्मा हा आत्म्याच्या ठिकाणीच असतो.

**परमपूज्य समर्थ सद्‌गुरू दास कबीर**
**नागावकर महाराजांचा जय जयकार असो.**
**परमपूज्य समर्थ सद्‌गुरू मोहिते**
**सरकार महाराजांचा जय जयकार असो.**





# Dr. Sunil Dada Patil,

The Raj Bhavan, House of Books,
C/o **KavitaSagar Publishing Agency**,
215, Malbhag, Near Water Tank,
At and Post - **Dharangutti - 416102**,
Via - Nandani, District - Kolhapur,
Maharashtra, India, Telephone -
9975873569, 8484986064,
sunildadapatil@gmail.com

## ॥ सद्गुरु प्रसन्न ॥
## आकाश मार्ग गुप्त पंथ

आकशमार्गी गुप्त पंथ । जाणती योगिये समर्थ ।
इतरांस हा गुहयार्थ । सहंसा न कळे ॥
1-9-5 दास बोध

ब्रम्हानंद परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम्।
द्वंद्वातीतं गगनसद्दश्यं तत्वम स्यादिलक्ष्यम्।
एकं नित्यं विमलचलं सर्वेधीसाक्षिभूतम् ।
भावातीतं त्रिगुणरहित सद्गुरु तं नमामि ॥

गुरुम्ब्रहा गुरुविष्णु गुरुर्देवो महेश्वराः ।
गुरुः साक्षात् परंब्रम्ह । तस्मै श्रीगुरवे नमः
अखंड मंडलाकार व्याप्तेन चराचर तत्वंतथ पदं
दर्शन तस्मै श्रीगुरुवेन नमः ॥

प्रल्हाद, नारद, पराशर, पुंडरिक, व्यास, अंबरिष
शुक, शैनिकादिक, भिष्म, दालभ्याम् रुक्मांगदा अर्जुन
वशिष्ठ बिभिषणादि पुण्यानिमाम्। परंभागवतां स्मरामि ।
आदिनाथ, मस्यैद्रं, गोरक्ष, गहिनी स्ततः निवृत्ती,
ज्ञानदेव देवाय चुडामुनिनमः ।।

अखंड आनंदरुपाय समज्ञान प्रदायनि भवभ्रांति विनाशाय ।

गुंडाक्य, रामचंद्र, महादेव, रामचंद्र, विश्वनाथ,
रामचंद्र, गोविंदाय, कबीराय, सदगुरु सरकार महाराज नमः।

कवितासागर पब्लिशिंग एजन्सी
KavitaSagar Publishing Agency

ज्ञानेश्वरीतील गुरुगम्य ज्ञान (आध्यात्मिक)
ISBN 978-81-949977-8-8
महेश मानसिंग निकम (कोल्हापूर)
कवितासागर पब्लिशिंग एजन्सी, जयसिंगपूर
+91 8484986064 | +91 9975873569
sunildadapatil@gmail.com
ISBN 978-81-949977-8-8
9 788194 997788

An Imprint of KavitaSagar